# निवेदन

सौन्दर्यप्रसाधनाकडे जरा प्रमाणाबाहेर लक्ष पुरविणाऱ्या एका परिचित तरुणीच्या वेशभूषेवर मीं एकदा थट्टेतच पण बोचक अशी टीका केली. अपेक्षेप्रमाणे, 'सनातनी', 'बॅकवर्ड' वगैरे विशेषणाचीं अस्त्रें माझ्यावर फेकून तिने मला अखेरीस निरुत्तर करण्याच्या उद्देशानें, "असं नको, तसं वाईट दिसतं, तर मग कसं पाहिजे ते सांगा की!" असे आव्हानच दिले. त्यानंतर ह्या पुस्तकाच्या आरंभी वर्णिलेले दृश्य व तशाच प्रकारचीं आणखी काहीं भयंकर दृश्ये पाहण्याचे प्रसंग माझ्यावर अल्पावधींतच ओढवल्यामुळे स्त्रीसौन्दर्याविषयीं मी अगदी 'गंभीरपणे' विचार करावयाचे ठरविले. नंतर, सर्वांसाठीं नाहीं, तरी निदान मला आव्हान देणाऱ्या त्या तरुणीसाठीं तरी, 'कसं असावं' ह्या प्रश्नाविषयी माझ्या बुद्धीप्रमाणे प्रस्तुत पुस्तक मी लिहावयाचे ठरविले.

गेल्या काही वर्षांत, विशेषतः अगदीं अलीकडे, महाराष्ट्रीय सुशिक्षित समाजातील स्त्रियांच्या वेशभूषेमध्यें अतित्वरेने जो फरक पडत चालला आहे आणि ह्या गोष्टीपुरते जे भिन्न भिन्न व नवीन आदर्श स्त्रियांच्या अभिरुचीवर बरावाईट परिणाम करीत असलेले दिसत आहेत त्यांच्याविषयीं थोडाफार विचार करण्याची वेळ आता खास आली आहे. कारण, सुंदर दिसावे या हेतूने वेशभूषेचे जे नवे प्रकार रूढ केले जात आहेत त्यांपैकी काही प्रकार निश्चितपणे सौन्दर्यविघातक असे, व त्याहीपेक्षा, 'स्त्री' म्हटली म्हणजे आपल्या मनामध्ये जो थोडासा आदर व सहानुभूति उत्पन्न होते, त्याऐवजी तिरस्कार व इतर अनुदार भावना निर्माण करणारे असे आहेत. अर्थात्, असे वाटणाऱ्या पुरुषाचीं मनेच कोतीं, त्यांची दृष्टीच पूर्वग्रहदूषित, वगैरे प्रकारची उत्तरे, त्या प्रथांच्या पायिकांकडून,- किंवा प्रचलित प्रवृत्तीच्या थोडेसे जरी विरुद्ध बोललें तरी

आपल्यावर 'सनातनी' वृत्तीचा शिक्का मारला जाईल ह्या एकमेव भीतीनें, मनातून पटत नसताही, उगवत्या सूर्याची स्तुती करणाऱ्या, भित्र्या वृत्तीच्या काहीं सुज्ञब्रुवाकडून मिळालीं तरी, त्यामुळें मनात उद्भवणाऱ्या भावना काही नाहीशा होऊ शकत नाहींत. एका अनौपचारिक चर्चेमध्ये अत्यंत रसिक, खऱ्या अर्थाने पुरोगामी व उदारमतवादी, अशा माझ्या काही मित्रानी देखील वेशभूषेच्या विशिष्ट प्रकाराबद्दल मी वर उल्लेख केल्याप्रमाणेच प्रतिकूल अभिप्राय व्यक्त केले. ह्यावरून, त्या बाबतीतील स्पष्टोक्तीला केवळ स्त्रीदाक्षिण्यच आडवें येते, व वाटते ते बोलण्याऐवजीं 'बर आहे की !' असे म्हणून आपण वेळ मारून नेत असतो, असाच निष्कर्ष निघतो.

अग्रेसरत्वाचा मान ज्याना केव्हातरी मिळालेला आहे त्याना 'मागें पडल्याचा' किंवा लोकानी तसे म्हणावे या गोष्टीचा विषाद वाटणे साहजिक आहे. पण स्वयप्रेरित व लोकमतानुवर्ती या दोहोमधील भेद ध्यानात ठेवणे देखील अगत्याचे आहे. तर्कशुद्ध व शास्त्रीय भूमिकेचे पाटबळ आणि श्रद्धा याचा अभाव नसेल तर, कोणत्याही नवीन विचारप्रवाहाबरोबर वाहत जाणाऱ्या जनसमर्दांच्या अविचारी अपवादाला भिण्याचे अनुभवी आणि अधिकारी व्यक्तींना कारण नाही. तथापि, कोणत्याही कारणाने का असेना, पण अधिकारी माणसे टाळाटाळी करू लागली, प्रमाणाबाहेर अनास्था दाखवू लागली, म्हणजे अपरिपक्व बुद्धीची, अननुभवी, अनधिकारी माणसे एका प्रकारच्या हिरीरीने आपल्या सामर्थ्याबाहेरचे काम अगीकारावयाला पुढे सरसावतात. हे पुस्तक लिहिण्यामागील माझी भूमिका अशाच प्रकारची आहे.

सत्य, शिवं आणि सुन्दरम् अशा प्रकारची जगाचे नियंत्रण करणाऱ्या आदितत्त्वाची त्रिविध कल्पना परपरागत तत्त्वज्ञानामध्ये आढळते. त्याचबरोबर, जे सत्य आहे ते शिवहि असलेच पाहिजे व सुदरहि असणारच अशी अन्योन्याश्रयाचीही कल्पना आहे. अर्थात् जे सुन्दर आहे ते सत्य आणि शिव (चागले किंवा हितकर) असलेच पाहिजे अशी श्रद्धावताची

विचारसरणी असते. पर्यायानें, हे तीन्ही गुण एकच आहेत आणि जें सत्य नाहीं किंवा शिवहि नाहीं ते सुन्दर असूच शकणार नाही असे प्रमेय आपोआपच उद्भवते. ह्या विचारसरणीवर विश्वास असो वा नसो, पण 'सुन्दर' ह्या शब्दामध्ये इतर कोणत्या परपरागत कल्पनाचा समावेश करण्यात आलेला आहे हे सौन्दर्यगुणाविषयीं विचार करीत असताना लक्षात ठेवण्याजोगे आहे.

सौन्दर्य म्हणजे काय, याविषयीं ह्या पुस्तकात जी चर्चा केली आहे ती श्रद्धेवर आधारलेली नसून शक्य तितक्या तार्किक दृष्टीने केलेली आहे. सौन्दर्याचा प्रभाव भावनाच्या ठिकाणी अनुभवावयास मिळतो व बुद्धी हा सौन्दर्याची पारख करण्याचा खरा निकष नव्हे, पण भावना ह्या वैयक्तिक स्वरूपाच्या असल्याने सौन्दर्यानुभवहि व्यक्तीव्यक्तीमध्ये भिन्नसाच असणार. मग, सौन्दर्याविषयीची चर्चा कशी शक्य आहे? असा प्रश्न उद्भवणें साहजिक आहे.

हा प्रश्न जरा वेगळ्या पद्धतीने सोडविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. सौन्दर्याचे वस्तुनिष्ठ (objective) स्वरूप कल्पिल्याशिवाय त्याविषयीची चर्चा सर्वमान्यत्व पावूं शकणार नाही. यासाठीं, सौन्दर्य अनुभविणारी व्यक्ती, आणि ज्याच्या ठिकाणीं वास करीत असलेले सौन्दर्य त्या व्यक्तीला अनुभविता येते ती वस्तु, अशी दोन भिन्न अगे प्रथम निश्चित केली पाहिजेत. त्यानतर, सौन्दर्याभास निर्माण करणारे कोणते गुण त्या वस्तूच्या ठिकाणीं उपलब्ध आहेत व त्याचा परिणामहि थोड्यातरी प्रमाणात सार्वत्रिक स्वरूपाचा, किंवा हेतुनिरपेक्षतेने सर्वाना अनुभविता येण्यासारखा आहे किंवा नाही, हे पाहण्याचा प्रयत्न केला पाहिजे. असा प्रयत्न करणे हीच सौन्दर्याची वस्तुनिष्ठ चिकित्सा.

आपली चर्चा स्त्रीसौंदर्याविषयींचीच असल्याकारणाने स्त्री ही सौंदर्यानुभव देणारी वस्तु असें मानून असा अनुभव देणारे तिच्यामधील शाश्वत व आवश्यक गुण कोणते, व त्याबरोबर सौन्दर्यानुभव घेणाऱ्या व्यक्तीच्या ठिकाणीं आढळणाऱ्या आकस्मिक व हेतुनिष्ठ कारणामुळें सौंदर्यगुणामध्यें

कोणत्या गौण, अनवश्यक व अनुचित कल्पनांचा अंतर्भाव प्राचीन-कालापासून आजपर्यंत झालेला आहे व होत असलेला दिसतो, ह्याची देखील चर्चा केली आहे. शेवटीं, आकस्मिक तत्त्वाचें व कल्पनाचे अनौचित्य दाखवून शाश्वत तत्त्वे कोणती याचा उल्लेख केला आहे.

पुस्तक लिहिण्यामागील मूळ उद्देश ध्यानीं घेता, पार्थिव सौदर्याच्या चर्चेला प्राधान्य देणे क्रमप्राप्त होते. तथापि मानसिक सौदर्याचे महत्त्व कमी आहे असे मला मुळीच वाटत नाही. मानवाचे जीवन शरीरधर्म व मनोव्यापार ह्या दोन्ही घटकानीं बनलेले आहे. शारीरिक सौन्दर्याची प्रतिष्ठा प्रमाणाबाहेर वाढवून मानसिक सौदर्याला गौणत्व देणे म्हणजे अतिमानुप स्थितीकडे जाण्याचा प्रयत्न करण्याऐवजी अप्रत्यक्षपणे अ-मानुषपणाचे ध्येय स्वीकारण्यासारखे आहे तथापि मानवामध्ये ह्या दोन्ही प्रवृत्तीचा किंवा उपागाचा सगम झाल्याकारणाने त्याचे परस्परमहत्त्वहि काही तरी प्रमाणात राहणे अवश्य आहे. या दृष्टीने, शरीराला अवास्तव महत्त्व देऊन व केवळ शारीरिक सौदर्याच्या मागे लागून मानसिक सौदर्याविषयीं अनास्था दाखविणे जितके अयोग्य, तितकेच मानसिक गुणविशेषाना प्रमाणाबाहेर महत्त्व देऊन शारीरिक सौन्दर्यगुणाविपयी बेफिकीर राहणेही अयोग्य सुदर वस्तूच्या किंवा व्यक्तीच्या सान्निध्या-मुळे इतराच्या जीवनामध्येही सौदर्य निर्माण होत असते.

मन आणि शरीर ही एक प्रकारे आपल्या नियत्रणाच्या बाहेर अस-तात. तथापि, त्याच्यावर प्रभुत्व मिळविणे हीच मानवाची कर्तबगारी. शरीरावर प्रभुत्व चालविणे यात मनाचे सामर्थ्य प्रतीत होते. त्याच वेळी, निरोगी व सुदृढ शरीर अप्रत्यक्षपणे आपल्या मनोवृत्तीचा सयम साधीत असते. म्हणजे, शरीर आणि मन याच्यामध्ये सगति (harmony) असणे ही गोष्ट त्या दोहोच्याहि सौदर्याची वृद्धि करीत असते.

मानवाचे जड अस्तित्व शरीरधर्माच्या आधीन असते आणि मानसिक जीवन, ज्ञान (knowing), भावना (feeling) व ईषणा (willing) ह्या त्रयीनें नियन्त्रित केले जात असते. व्यवहारात व सामाजिक जीवना-

मध्ये शारीरिक व मानसिक अस्तित्व ह्याचे समीलन अथवा अभिन्नत्व निर्माण होते. ह्या दोन्ही प्रकारच्या अस्तित्वावर अधिष्ठित अशी अनेक कर्तव्ये मानवाला पार पाडावयाची असतात. शरीर सुदर दिसण्याला जशी त्याच्या अवयवामध्ये प्रमाणबद्धता असावी लागते, तद्वतच एकदर अस्तित्त्वाचे किंवा जीवनाचे सौदर्य साधावयाचे तर त्यामध्येहि सर्व उपागाची व कर्तव्याची प्रमाणबद्धता साधली पाहिजे. देहाचे सौदर्य हे आत्यतिक ध्येय ठेवून आपल्या कौटुबिक, सामाजिक, राष्ट्रीय, इत्यादि महत्त्वाच्या दृष्टीने वाढत्या प्रमाणात असणाऱ्या कर्तव्याकडे दुर्लक्ष करणे म्हणजे जीवनाची प्रमाणबद्धता व सौदर्य बिघडविण्यासारखेच आहे. आपल्या समाजाच्या किंवा राष्ट्राच्या हिताच्या दृष्टीने, शरीराच्या सौदर्य-प्रसाधनासाठी आपला देह विदेशी वस्त्राभरणानी सजविणे अनुचित ठरत असेल तर अशावेळी, कर्तव्य म्हणून, आपली सौदर्याभिलाषा गौण मानून ताब्यात ठेविली पाहिजे, किंवा, राष्ट्रहितविरोधी नसतील त्या मार्गानीच तिची सिद्धी केली पाहिजे. हेच तत्त्व जीवनाच्या विविध उपागाच्या बाबतीत आचरिले पाहिजे. प्रमाणबद्धता हाच शारीरिक व मानसिक सौन्दर्याचा आत्मा आहे.

प्रस्तुत पुस्तकाच्या मुख्य विषयासबधी—स्त्रीसौदर्याच्या कल्पनेविषयी—सौदर्यविभागामध्ये, माझ्या अल्पमतीप्रमाणे शक्य ती चर्चा केली आहेच. पण आपल्या सस्कृत भाषेमध्ये कालिदासादि रसिक कवीनी ज्या कल्पना व्यक्त केल्या आहेत त्याच्याविषयी थोडेसे लिहिणे अवश्य आहे.

प्रा. के. ना. वाटवे यानी मला सस्कृत कवींचा स्त्री-सौन्दर्याविषयीचा दृष्टिकोन समजावून दिला. त्याचे साह्य आधी मिळू शकले असते तर त्याचा मला बराच लाभ झाला असता. तथापि पुस्तकामध्ये समाविष्ट करता न आलेली माहिती येथे देणे अवश्य वाटते.

सस्कृत भाषेतील ललितवाङ्मयामध्ये स्त्रीसौदर्याची हृदयगम वर्णने अनेक ठिकाणी पाहावयास सापडतात. तथापि बहुतेक ठिकाणीं कवींचा

दृष्टिकोन प्रामुख्याने शृंगारप्रधान असलेला दिसतो. कविश्रेष्ठ कालिदासाच्या मेघदूतामध्ये ह्याचे प्रत्यतर अनेक ठिकाणी पाहावयास सापडते—

तन्वी श्यामा शिखरिदशना पक्वबिम्बाधरोष्ठी
मध्ये क्षामा चकितहरिणीप्रेक्षणा निम्ननाभिः
श्रोणीभारादलसगमना स्तोकनम्रा स्तनाभ्या......

ह्या श्लोकामध्ये केलेले शारीरिक सौंदर्याचे वर्णन शृंगारप्रधान असेच आहे. अर्थात्, कवीची रसिकता इतकी बहुविध आहे की, उत्तान-शृंगार प्रस्तुत काव्यामध्ये ओतप्रोत भरलेला असूनहि त्याच्या अतिरेका-कडे दुर्लक्ष करावेसेच वाटते.

स्त्रीसौंदर्याचा आविष्कार निसर्गनिर्मित जड व सचेतन वस्तूच्या, वृक्षलताच्या व पशुपक्ष्याच्या उपमा देऊन करण्याचा कविसकेत सस्कृत वाङ्मयात रूढ आहे. स्त्रीच्या नयनरम्य गतीची कल्पना, हस, गज, इत्यादि प्राण्याच्या गतीची उपमा देऊन किवा 'पवनाधूतलतासु विभ्रमः' अशा प्रकारे कल्पनारम्य साम्यस्थळे दाखवून केलेली आढळते. 'प्रतनुपु नदीवीचिषु भ्रूविलासात्' ह्या रम्य कल्पनेने भुवयाची मधुर हालचाल व्यक्त करणे व शरीराच्या निरनिराळ्या अवयवाचे फुले, फळे, वेली, वृक्ष, भ्रमर, पक्षी, हरिणी (मृगाक्षी) इत्यादीशी सादृश्य दाखविणे ह्या चतुर योजनाचा उपयोग कवींनी भरपूर प्रमाणात करून घेतला आहे.

सौंदर्याचे व्यक्तिनिष्ठ स्वरूप ध्यानात घेऊन 'किमप्यस्ति स्वभावेन सुन्दर वाप्यसुन्दर । यदेव रोचते यस्मै भवेत्तत्तस्य सुन्दरम् ॥' हे एका कवीने म्हणून ठेविले आहे. तथापि सौंदर्याचे आवश्यक व शाश्वत गुण कोणते ह्याविषयी कुमारसम्भवावरील टीकेमध्ये मल्लिनाथाने भूपाल-कवीचा खालील श्लोक उद्धृत केला आहे.

मुक्ताफलेषु छायायास्तरलत्वमिवान्तरा ।
प्रतिभाति यदङ्गेषु लावण्य तदिहोच्यते ॥

शाकुन्तलावरील टीकेमध्ये राघवभट्टानें पुढील श्लोक दिला आहे.

अङ्गप्रत्यङ्गकाना यः सन्निवेशो यथोचितम् ।
सुश्लिष्टः सन्धिबन्धः स्यात्तत्सौन्दर्यमुदाहृतम् ।।

या श्लोकावरून सस्कृत कवीची दृष्टि केवळ शृगारिक व विलासप्रधान किवा वैषयिक होती असे म्हणता येणार नाही. मात्र वर दिलेल्या दोन उताऱ्यातील दृष्टिकोन अल्प प्रमाणातच प्रतीत झालेला आहे.

स्त्रीसौदर्याविषयी शास्त्रीयदृष्ट्या– काव्यात्मक दृष्टीने नव्हे– विचार करून लिहिलेले मराठी ग्रथ मला तरी उपलब्ध झाले नाहीत. इग्रजी भाषेत त्या विषयावर पुष्कळ वाङ्मय प्रसिद्ध झालेले आहे. पण त्या ग्रथाविषयीचे कुतूहल देखील आपल्याकडील सुशिक्षितामध्ये अल्पसेच असल्यामुळे ते ग्रथ उपलब्ध व्हावयाला अडचण पडते. यामुळे ग्रंथगत वाङ्मयाचे साह्य ह्या पुस्तकाच्या कामी मला मिळावयास पाहिजे तितके मिळू शकले नाही.

अनेक प्रकारच्या प्रतिकूलतेमुळे पुस्तकाच्या विस्ताराला मर्यादित करणे अवश्य झाले. यामुळे, चित्रे व शिल्पकलाकृति याच्याद्वारा स्त्री-सौन्दर्याचा दृश्य आविष्कार करणाऱ्या कलावताचा सौन्दर्यानुभव, आणि त्यामागील प्रमुख तत्त्वे, याचाच मला ह्या चर्चेसाठी उपयोग करून घ्यावा लागला. पुस्तकाच्या शेवटी आधारग्रथाची सूची दिली आहे तीवरून ही गोष्ट स्पष्ट होईल.

काव्यादिकाचा माझा अभ्यास दुर्लक्षणीय म्हणण्याइतका अल्प आहे. यामुळे, माझ्या चर्चेमध्ये निश्चितपणा आणण्यासाठी मला अनेक विद्वानाशी विचारविनिमय करणे अवश्य झाले. या बाबतीत, साहित्यसम्राट् न. चिं. केळकर, प्रा. वा. म. जोशी, प्रा. ना. गो. चापेकर, प्रा. श्री. म. माटे, आणि प्रा. ना. ग. नारळकर याचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख केलाच पाहिजे. सौ. कमलिनीबाई दामले यानी इतरापेक्षा वेगळ्या प्रकारच्या विचाराची दिशा दाखवून चर्चेचा एकागीपणा घालविण्याच्या कामी केलेले साह्य विशेष महत्त्वाचे आहे. तसेच नामोल्लेख न करण्याचे अभि-

वचन प्रथम घेऊन ज्या दोघा विदुषींनीं मला त्याच्याशीं विचारविनिमय करण्याची संधि देऊन ज्या बहुमोल सूचना केल्या त्याचा 'अनामक' ऋणनिर्देश करणे अवश्य वाटतें.

ह्या पुस्तकात अनावृत स्त्री-देहाचीं काहीं चित्रे दिली आहेत. पण चर्चेचा विषय लक्षात घेता त्याचे औचित्य ध्यानात येईल. नग्नत्वाच्या प्रदर्शनासाठीं किंवा हलक्या अभिरुचीच्या समाधानासाठीं काहीं ती दिलेलीं नाहीत एवढे सागून ठेवणे अवश्य वाटते.

सौदर्यप्रसाधनाची चर्चा करणे हा ह्या पुस्तकाचा मुख्य विषय नाहीं. तथापि, त्या गोष्टीला व्यावहारिक महत्त्व असल्यामुळे त्यासबधी काहीं तात्त्विक स्वरूपाची चर्चा पुस्तकाच्या शेवटीं दिली आहे. शक्य त्या ठिकाणीं उपयुक्त अशा चित्राची योजनाही केली आहे.

स्त्रीसौन्दर्य व तदनुषगिक व्यावहारिक प्रश्न याविषयीचे औदासीन्य व अधानुकरणाची प्रवृत्ती जाऊन ह्या विषयासंबधी आपल्या समाजामध्ये जागृति व पद्धतशीर चर्चेची संभाव्यता उत्पन्न करण्याचे काम ह्या पुस्तकाने केले तरी माझा उद्देश सफल झाल्याचे समाधान मला लाभेल.

चित्रकलेचे प्रसिद्धिविन्मुख भक्त रावबहादूर अत्रे याच्या सग्रहीं असलेल्या अमूल्य ग्रथसपत्तीचा उपयोग करून घेण्याची सधि उदारपणे मला दिल्याबद्दल त्याचा मी अतिशय ऋणी आहे.

पुस्तकाच्या कामीं ज्या ज्या व्यक्तींचे प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीतीने मला साह्य झाले आहे त्या सर्वांचे पुनः एकवार आभार मानून हे प्रदीर्घ उद्दिष्टकथन सपवितो.

आर्यसस्कृति मुद्रणालय,
पुणे शहर.
ता. ६।२।१९४२.

यशवन्त गणेश वझे.

प्रिय कन्या

चि. इन्दुकला

हिला तिच्या सातव्या वाढदिवसानिमित्त

सप्रेम भेट

# स्त्री आणि सौंदर्य

मुंबईंतील विठ्ठलभाई पटेल रस्त्यानें ऐन गर्दीच्या सध्याकाळी एकदा मी चाललों असता माझ्यापुढील पाचपन्नास कदमातली रहदारी विस्मयकारक रीतीनें एकाएकी स्थगित झाली अगदीं घाईघाईनें चाललेलीं माणसें जागच्या जागी थिजल्यासारखीं स्तब्ध उभी राहिलीं आणि थोड्या विचित्र अशा दृष्टीनें एका विशिष्ट दिशेने पाहूं लागली. बेफाम भरवेगात धावणारी वाहनें देखील किंचित् काल स्थिरावल्याचा मला भास झाला.

ह्या आकस्मिक 'अचलते'चें कारण काय हें शोधण्यासाठी इतर माणसे पाहात होतीं त्या दिशेला मी दृष्टि वळविली—

—आणि जें दृश्य माझ्या नजरेस पडलें तें मी केव्हाहि विसरणे शक्य नाही.

लॅरेल हार्डी किंवा जाड्या आणि रड्या याचे सहजविनोदी चित्रपट तुम्हीं पाहिले आहेत काय?

उण्यापुऱ्या सहा फूट उंचीची, तेलिया कृष्ण कांतीची, अगदी काटकुळी– कळकाच्या काठीसारखी– अशी एक 'बाई', आणि तिच्याबरोबर चार फुटापेक्षा देखील बुटकी, कमालीची बाळसेदार –उंचीरुंदीच्या मोजमापात जवळजवळ मुळींच अंतर नसलेली–, सपिठासारखी गोरी अशी दुसरी एक महिला, अशी ही भयंकर जोडी कसल्यातरी गंभीर विषयाचा खल करीत ऐसपैस हातवारे करीत समोरून येत होती.

त्याच्या देहरचनेमध्यें व अंगकातींत अणुमात्रहि साम्य नसलें तरी त्यांच्या वेशभूषेमध्यें तिळभर देखील फरक नव्हता रुंद लालभडक रंगाची गोल साडी, बिनबाह्यांचा काळा ब्लाऊझ, पायात उंच टाचाच्या पण सपाट तळव्यांच्या चढावासारख्या 'सॅडल्स', सिनेमातारकांना देखील खालीं पाहायला लावण्याजोगे कानातले प्रशस्त डूल, मंद वाऱ्यानें सुद्धां बेगुमानपणें इतस्ततः सचार करून कपाळाच्या मर्यादा झांकून टाकणाऱ्या– मुद्दाम कापून तोकड्या केलेल्या–केसाच्या बटा, काळसर लाल रगाचे (अर्थात् रगविलेले) ओठ, सहज ध्यानात येण्यासारखें केलेलें गालांवरचें रंगकाम ...मला वाटतें, कल्पना येण्यासाठीं एवढा तपशील पुरे.

स्त्री म्हणजे स्त्री, आणि ती सुंदर असते, ही आजवरची माझी कल्पना. ह्या प्रसंगापूर्वी कुरूप स्त्रिया मी पुष्कळ पाहिल्या असतील पण त्यामुळे माझ्या सामान्य भावनेवर कांहीं बाधक परिणाम झाला नव्हता.

पण हें दृश्य पाहिल्यानंतर मीं पहिला प्रश्न स्वतःलाच विचारला : "स्त्री आणि सौदर्य याचा दूरचा तरी संबंध असणें अवश्य आहे का?"

आजपर्यंत कधींहि वाटलें नाहीं इतकें कुतूहल, दहा वर्षांपेक्षां अधिक काल विवाहित आयुष्याचा अनुभव घेतलेला असतांना देखील कधीं मनात आले नाहींत असे 'स्त्रीसौदर्य'विषयक विचार, तेव्हांपासून मला पदोपदीं भेडसावूं लागले आणि स्वतःच्या समाधानासाठीं म्हणून मीं त्या प्रश्नाचा जो विचार त्यानंतर केला तोच ह्या पुस्तकांत मी मांडणार आहें.

# स्त्री

"सुंदर स्त्री कुणाला म्हणाल ?" असा थोड्याफार अनिश्चित स्वरूपाचा प्रश्न चाळीशीची मर्यादा गाठलेल्या पण सुशिक्षित अशा बाईंना मीं विचारला.

माझ्या प्रश्नाचा रोंख नीटसा न कळल्यामुळें क्षणभर विचार करून त्यानी थोडेंसें विनोदानें उत्तर दिलें, "जी स्त्री आहे आणखी सुंदरहि आहे अशा बाईला."

पण ह्या त्यांच्या उत्तरात, मला वाटतें, फार अर्थ भरलेला आहे.

"जी स्त्री आहे " म्हणजे काय ?

कोणत्याहि प्रश्नाबद्दल विचार करण्याच्या दोन पद्धती असतात. एक तात्त्विक पद्धति व दुसरी व्यावहारिक.

एकाद्या गोष्टीविषयीं हेतुनिरपेक्ष ज्ञान करून घ्यावयाचें असतें त्या वेळीं शास्त्रीय किंवा तात्त्विक पद्धति उपयोगात आणावी लागते. A Scientist never proves anything, he simply tries to understand facts." एकादी गोष्ट सिद्ध करणें ही खऱ्या शास्त्रज्ञाची भूमिका नसून वस्तुस्थितीचें ज्ञान करून घेणें हेंच त्याचें कार्यक्षेत्र. शास्त्रीय संशोधनांत किंवा चिकित्सक दृष्टीनें केलेल्या वादविवादात अथवा विचारात जे निष्पन्न होईल ते तात्पुरतें तरी मान्य करण्याची तयारी शास्त्रज्ञाला ठेवावी लागते. असें असलें तरी बहुतेक भौतिक शास्त्रांत गृहीत अशी तत्त्वें किंवा सिद्धान्त (Hypothesis) असतातच व तीं चुकीचीं आहेत असे सिद्ध होईतों त्यांच्या खरेपणाविषयीं कुणीं शंका घ्यावयाची नाहीं असा सकेतच ठरलेला असतो. तथापि अंतिम सत्याचा शोध करणाऱ्या तत्त्वज्ञानी माणसाची भूमिका इतर शास्त्रज्ञांपेक्षां थोडीशी भिन्न

असते. आपल्या चिकित्सेचा किंवा विषयाचा मूळ पाया देखील तर्कशुद्ध विचाराच्या निकषावर पारखल्याखेरीज तो सहसा मान्य करीत नाही.

व्यावहारिक पद्धतीनें विचार करताना अशा प्रकारच्या निरपेक्ष दृष्टिकोनाची अपेक्षा सामान्यत: बाळगिली जात नाहीं. बहुतेक वेळा तसें करण्याची अवश्यकताहि नसते, अर्थात् तर्कशुद्ध विचार-सरणीची उपेक्षा करून येथेंहि चालत नाहीं हें खरें, पण अल्प महत्त्वाच्या मुद्दयाचा काथ्याकूट करण्यात जो कालव्यय होतो तो चुकविल्याशिवाय साध्यासुध्या गोष्टींचा निर्णय लागणे दुरापास्त होईल. व्यावहारिक प्रश्नाचें स्वरूप सामान्यत: तात्कालिक महत्त्वाचे असल्याकारणानें त्या प्रश्नाविषयींची साधारणपणे विश्वसनीय माहिती मिळविली म्हणजे काम भागतें. अशी माहिती तर्कानें किंवा अतिसूक्ष्म संशोधनानें मिळवावयाची नसून सभोंवतालच्या परिस्थितीवरून पूर्वग्रहदोषविरहित अशा निरीक्षणाच्या साह्यानें ती मिळवावयाची असते. अर्थात् पूर्वेतिहासाला अगदींच महत्त्व नाही असें नव्हे, ज्ञान आणि विज्ञान ह्याची शक्ति देखील कमी लेखून चालणार नाहीं. तथापि ह्या सर्वांना व्यवहाराची मर्यादा घालून कोणत्याहि प्रश्नाचा यथामति विचार करणें अयोग्य आहे असे वाटत नाहीं.

ह्या पुस्तकाच्या विषयाचा विचार करताना वरील दोन्ही पद्धतींचा आपल्याला उपयोग करून घ्यावयाचा आहे.

'स्त्री' म्हणजे काय?

'प्राणी' ह्या शब्दानें संबोधिल्या जाणाऱ्या सृष्टिविभागाकडे पाहिलें असता त्यात असंख्य जाती किंवा प्रकार आपल्याला

आढळतात. ह्या जाती मुळातच वेगवेगळ्या निर्माण केल्या गेल्या कीं उत्क्रान्तितत्त्वानुसार एकींतून दुसरी अशाप्रकारें त्या उत्पन्न होत गेल्या ह्या प्रश्नाशी आपल्याला फारसे कर्तव्य नाहीं.

'मनुष्य' देखील 'प्राणी' ह्या विस्तृत अशा सृष्टिविभागात सामावणारी एक जात आहे.

प्राणिमात्राचे सर्व व्यवहार मुख्यतः दोन प्रवृत्तींच्या अनुरोधानें चाललेले असतात. त्यापैकी एक प्रवृत्ति स्वसंरक्षणाची आणि दुसरी प्रजोत्पादनाची. पहिल्या प्रवृत्तीमध्यें सामान्यतः आधीं व्यक्ति व नंतर जाति असाच अनुक्रम लागतो. अर्थात् जातींच्या वैशिष्ट्याप्रमाणें ह्यात वेगवेगळे प्रकार किंवा स्वरूपे पाहावयास मिळतात.

प्रजोत्पादनप्रवृत्तीचा इतिहास म्हणजे निसर्गानें चालविलेले प्रयोग आहेत असेंच म्हणावें लागेल. मानव आणि तत्सम इतर प्राण्यांच्या जातींमध्यें प्रजोत्पादनक्रियेचा जो प्रकार आज आढळतो तो निसर्गाने अनादिकालापासून वेगवेगळ्या अवस्थांतील प्राण्यांच्या जातींवर चालविलेल्या प्रयोगांतूनच उत्क्रान्त झालेला आहे.

अद्यापहि कांहीं सूक्ष्म जंतूमध्ये (Bacterii) आढळणारी जी अगदीं प्राथमिक स्वरूपाची पद्धत, तीत मूळ प्राण्याच्या शरीराचे सारखे दोन भाग व्हावयाचे व नंतर प्रत्येक भाग स्वतंत्र प्राणी ह्या स्वरूपात अस्तित्वात राहावयाचा. या दृष्टीनें मूळ जनकाचं व्यक्तित्व बदललें तरी एकंदरींत तो अमरच राहतो. ह्या पद्धतीला Binary Fission असें म्हणतात.

निसर्गाच्या यापुढील प्रयोगात मूळ प्राण्याच्या शरीरापासून एक लहानसा विभाग वेगळा होऊन तो स्वतंत्रपणें वाढूं लागतो. जनक

जीव पुढें अशा अनेक जीवांना जन्म देऊन मरून जातो, किंवा त्याच्यांतील उत्पादनशक्ति संपल्याकारणाने त्या क्रियेसाठीं त्याचा दुसऱ्या प्राण्याशीं (अर्थात् त्याच जातीच्या) संयोग व्हावा लागतो. यातच मानवादि जातींमध्यें विद्यमान असलेल्या प्रजोत्पादनपद्धतीचें मूळ सापडतें. प्रारंभीं, उत्पादनासाठीं दोन स्वतंत्र प्राण्याच्या शरीरातील उत्पादक रसांचें संमिश्रण किंवा मीलन होऊन अशा मीलनातूनच नवा प्राणी जन्माला येतो. ह्या पद्धतींतून उत्क्रान्त झालेल्या लैंगिक उत्पादनांत श्रमविभागाच्या तत्त्वाचा लाभ उपलब्ध झाला. पुरुष-बीजकोशानें 'फलन'क्रिया (fertilization) करावयाची व स्त्रीनें त्या संयोगापासून उत्पन्न झालेल्या गर्भाच्या वाढीसाठीं किंवा संवर्धनासाठीं सत्त्वरसाचा साठा करण्याची जबाबदारी पत्करावयाची.

अशा प्रकारामध्यें नर किंवा पुरुष हा अवश्य असा घटक असला तरी तो निमित्तमात्रच असतो. प्रत्यक्ष सयोगानतर पुढील सर्व जबाबदारी मादी किंवा स्त्री एकटीच पार पाडते व उत्पन्न झालेली प्रजा स्वावलंबी (स्वसंरक्षणाच्या दृष्टीनें) होईतों तिचें सर्वतोपरी रक्षण व संगोपन करते.

प्रजोत्पादनाच्या कार्यांत नर-मादी किंवा पुरुष-स्त्री या परस्पर-पूरक घटकांवर जीं कर्तव्यें व ज्या जबाबदाऱ्या निसर्गानें टाकल्या आहेत त्यांना अनुकूल अशी त्यांची शरीररचना व प्रवृत्ती भिन्न प्रकारच्या बनविण्यांत आल्या. अगदीं प्रारंभस्थितींत 'स्त्री' आणि 'पुरुष' ह्या दोन घटकांतील आकृतिभेद फारच सूक्ष्म होता. पण पुढें पुढें हा भेद वाढत जाऊन मानवजातीच्या स्वरूपांत आढळणाऱ्या व ज्याला उत्क्रान्तिदृष्ट्या अगदीं 'अद्ययावत्' असें मान-

ण्यांत येतें अशा स्वरूपात अनेक प्रकारे तो अत्यंत स्पष्ट झाला आहे.

या ठिकाणीं एक गोष्ट ध्यानात ठेविली पाहिजे कीं गर्भावस्थेंत असलेला जीव हा पुढें पुरुष व्हावयाचा की स्त्री व्हावयाचा याबद्दलचा निर्णय निसर्गाकडून अगदीं प्रारंभींच पूर्णपणें दिला जात नाहीं. एका विशिष्ट मर्यादेपर्यंत दोन्ही प्रकारचीं वैशिष्ट्यें अंशत. त्या गर्भस्थितींतील जीवामध्यें अस्तित्वांत असतात. अशा वेळीं 'स्त्री' होणें किंवा 'पुरुषा'चा जन्म घेणे ह्यापैकी कोणतीहि गोष्ट त्याला शक्य असते पण जेव्हा निसर्गाचा निश्चय ठाम होतो तेव्हा तदनुसार ह्या वैशिष्ट्यापैकीं एका जातीच्या (पुरुष किंवा स्त्री) अवयवाची वाढ होऊ लागते व दुसऱ्या जातीचे अवयव फक्त अवशिष्ट स्वरूपात राहतात. आपल्या देहामध्यें विरुद्ध जातीच्या अवयवाचे अवशेष दिसतात याचें हेच कारण. प्रत्येक पुरुषामध्ये 'स्त्री'चा अल्पसा अंश असतो आणि स्त्रीमध्यें 'पुरुषा'चा अवशेष आढळतो. निसर्गाच्या अशा ह्या निर्णयपद्धतीमुळेंच संपूर्ण पुरुष (manly man) व संपूर्ण स्त्री (womanly woman) ह्या दोन टोंकामध्यें अनेक मधल्या स्थिति आढळतात. पुरुषी प्रवृत्तीची स्त्री व स्त्रैण वृत्तींचा पुरुष ह्याची कारणमीमांसा अशी आहे.

शास्त्रीय प्रयोग आणि संशोधन याच्या साह्यानें लैंगिक प्रश्नाबद्दल अनेक आश्चर्यकारक शोध शास्त्रज्ञाकडून प्रत्यहीं लावण्यात येत आहेत. गर्भस्थ जीवाला स्त्रीचा किंवा पुरुषाचा जन्म देणें ही गोष्टहि आपल्या लहरींच्या टप्प्यांत येणें अशक्य नाहीं. तथापि आपल्या इच्छेप्रमाणें निसर्गाला खेळविण्याची इच्छा होणें हा त्या शोधांचा साहजिक परिणाम मात्र तितकासा सुरक्षित किंवा इष्टहि

नाहीं. The Physiology of Sex ह्या पुस्तकाचे लेखक केनेथ वॉकर (Kenneth Walkar) यानीं म्हटल्याप्रमाणें—

"Unfortunately, our knowledge has got a long way ahead of our fitness to employ it, and, as in the case of children playing with gunpowder, harm rather than good comes from our new discoveries."

'दुर्दैवानें, उपलब्ध ज्ञानाचा योग्य रीतीनें उपयोग करण्याच्या आमच्यांतील पात्रतेच्या मानानें आमचें ज्ञान फारच पुढे गेलें आहे आणि बंदुकीच्या दारूशीं खेळणाऱ्या मुलाप्रमाणें आमच्या नव्या शोधांपासून हितापेक्षा आमचे अनहितच अधिक होतें' हा इषारा ध्यानात घेणें अत्यंत अगत्याचें आहे निसर्गाचें एकादें 'गुपित' हस्तगत झाल्यानंतर आपण त्याचा आपल्या हितासाठींच फक्त उपयोग करूं असा विश्वास मुळींच देता येणार नाहीं. शास्त्रीय ज्ञानाचा उपयोग मानवजातीचा भयानक संहार करण्याच्या कामीं सध्याच्या युद्धात केला जात आहे हें पाहिल्यानंतर याविषयीं संशय उरण्याचें कारण नाहीं. सदुपयोग करून घेण्यापेक्षां दुरुपयोग करण्याची प्रवृत्ति सामान्यत: अधिक बलवत्तर असते असेंच दिसून येईल.

स्त्री-पुरुषांच्या नैसर्गिक भूमिकांना अनुकूल व पोषक अशीं शारीरिक व मानसिक वैशिष्ट्यें त्याच्या ठिकाणीं विधात्यानें निर्माण केलीं. शारीरिक वैशिष्ट्यें मुख्यत: प्रजोत्पादनक्रियेच्या सिद्ध्यर्थ (functional success) योजण्यांत आलीं. ही गोष्ट सर्व प्राणिमात्रांना सारख्याच प्रमाणात लागू आहे. मानसिक किंवा उपजत





'नैसर्गिक' स्त्रीदेह

प्रवृत्ति, भावना इत्यादि गोष्टी देखील मुख्यतः नैसर्गिक भूमिकेला अनुरूप अशाच असतात.

मनुष्यजातीच्या प्राण्यांत प्रजोत्पादनाच्या क्रियेंतील महत्त्वाची जबाबदारी पार पाडणारा घटक म्हणजे स्त्री. ह्या नैसर्गिक भूमिकेला अनुकूल अशी खालील शारीरिक वैशिष्ट्यें स्त्रीच्या ठिकाणीं आढळतात.

(१) स्त्रीच्या शरिरातील सर्वांत रुंद भाग कटिबंध हा असतो. प्रजोत्पादनाच्या कामी उपयोगात येणारी सर्व इंद्रिये मुख्यतः ह्याच भागात सामावलेली असतात. पुरुषाच्या शरिराशी तुलना केली असता कटिबंधाच्या पेक्षा स्त्रीचा खांद्याकडील भाग बराच अरुंद असतो.

(२) त्वचेखालील मेदाचा (subcutaneous fat) संचय—
(अ) स्तनाच्या मागे (ब) पोटाच्या खालच्या भागात– ओटींत (क) नितंबाच्या भोंवतीं व (ड) मांड्यावर, असा विशेष असतो.

(३) केसाची विपुलता, मऊपणा व अवयवविशिष्ट वाटणी.

(४) आवाजातील कोमलता— वयात आलेल्या पुरुषाचा आवाज बदलून घोगरा होतो—तसा फरक स्त्रीच्या आवाजात होत नाही.

स्त्रीच्या उपजत प्रवृत्तींची व मनाची घडण ह्या गोष्टी विचारांत घेतल्या तर त्यामध्यें खालील वैशिष्ट्यें आढळतात.

(१) स्त्रीची मनोभूमिका मातृपदाला अनुकूल व पोषक अशीच असते.

(२) 'समागमाची तहान' पुरुषाच्यामध्ये आढळते तितकी स्त्रीमध्ये तीव्र नसते. अर्थात्, ह्याला अपवादात्मक अशी काही उदाहरणे असली तरी सामान्यतः स्त्री अशा गोष्टीत स्वयंप्रेरित नसते. पुरुषाच्या दृष्टीने संभोगसुख हेच साध्य असते. पण स्त्रीच्या बाबतींत ते प्रजोत्पादनसाध्याचे साधन एवढेच महत्त्व असते.

(३) केवळ शारीरिक सुखाचा ध्यास स्त्रीला तितकासा तीव्रपणे लागून राहात नाहीं व त्यात तिचें मन देखील फार कालपर्यंत रमणार नाही.

(४) 'लैंगिक तहान' स्त्रियाच्या बाबतीत परिवर्तनक्षम असून ती शक्ति स्त्रियाना अगदी शुद्ध अशा रीतीने सत्कार्यीं लावणे शक्य होते. स्त्रियामध्ये आढळणारा मैत्रिणीबद्दलचा जिव्हाळा हा ह्याच प्रवृत्तीचे द्योतक आहे. तसेच विधुरापेक्षा विधवाच आपले आयुष्य अधिक शुद्धपणे व शातपणे घालवू शकतात.

(५) माता ह्या भूमिकेवरून स्त्री कोणताहि महनीय त्याग करायला सिद्ध असते.

(६) जीवनसग्रामात प्रत्यक्ष भाग घेण्याची तिची उपजत प्रवृत्ति किंवा आवडहि नसते. आपले घर व प्रेमाचीं माणसे याच्यासाठी तिने स्वतः निर्माण केलेल्या विश्वाची राणी ही भूमिकाच निसर्गतः तिला अधिक प्रिय असते.

(७) स्त्रीची वृत्ति प्रेमळ व भावनाप्रधान असते. एका दृष्टीने हे थोडेसे दौर्बल्य आहे असे म्हटले तरी ती आपल्या विशुद्ध भावनानीं जे समजू शकते ते बुद्धिमान पुरुषाला त्याच्या विचाराच्या सामर्थ्याने देखील आकलन होईल असे नाहीं (The woman sees the world through her feelings).

मानव हा विधात्याच्या निर्मितीचा परमोच्च बिंदु असें आपण मानतो. इतर प्राणिमात्रामध्यें न आढळणारी बुद्धिमत्ता, वाचेची देणगी, नैसर्गिक प्रवृत्तींपेक्षां भिन्न अशी इच्छाशक्ति व आत्मप्रत्यय इत्यादि अनेक गुण मनुष्याला इतर प्राणिमात्रापेक्षा अधिक 'उच्च' अशा स्थानावर अधिष्ठित करायला कारणीभूत झाले आहेत हें सर्वांना पटतें. पण अस्तित्वासाठीं चालणारा मानवी जीवनकलह आणि स्त्रीपुरुषसंबंधासारख्या अत्यंत नैसर्गिक बाबतीमध्यें आपल्या-

पुढें उपस्थित होणारे प्रश्न (problems) ह्या दोन गोष्टीबद्दल विचार केला असता व इतर प्राणिमात्रांच्या अगदीं बिनबोभाट चाललेल्या आयुष्यक्रमाशी मानवी व्यवहाराची तुलना केली असतां आपल्या 'उच्च'पणाच्या कल्पनेला सूक्ष्मसा धक्का बसल्याखेरीज राहात नाहीं.

मानवजातीचे व्यवहार कोणत्या तरी विवक्षित तत्त्वानुसार किंवा कोणतें तरी व्यक्त अथवा अव्यक्त ध्येय साधण्याच्या दृष्टीनें चाललेले असतात हा नीतिशास्त्राचा पाया. तें ध्येय साधण्याच्या दृष्टीनें व्यक्ति हाच घटक मानला जावा कीं समाजानें 'सांगाती' त्या ध्येयाकडे प्रवास करावयाचा असतो याबद्दल मतभेद असूं शकेल. ध्येयाचा विचार करूं लागल्यास कुणी म्हणतील कीं 'सुख' (happiness) हें ते ध्येय आहे. दुसरे म्हणतील कीं 'पूर्णत्व' (perfection) हेंच माणसाचें साध्य. कुणी म्हणतील की मनुष्यानें 'मोक्ष' मिळवावयाचा आहे.

पण ह्या सर्व वादग्रस्त प्रश्नाचा निर्णय कांहींहि लागला तरी जोपर्यंत मनुष्याला—व्यक्तीला किंवा समाजाला—तें ध्येय साधावयाचें आहे तोंपर्यंत 'स्वसंरक्षण' आणि 'जातिसातत्य' ह्या दोन गोष्टी कांहीं दृष्टिआड करता येत नाहींत. नैतिक ध्येय एकाच पिढीत साध्य व्हावयाचें असेल तर गोष्ट वेगळी. पण तसें आश्वासन कोणताहि तत्त्वज्ञानी देत नाही एकच गोष्ट सर्वमान्य झालेली दिसते; ती हीच कीं "...This is an everlasting struggle" अनंत कालपर्यंत चालणारा असा हा संग्राम आहे.

अर्थात्, मनुष्यप्राण्याला आपली 'जात' पृथ्वीच्या पाठीवर टिकवावयाची आहे आणि त्यासाठीं इतर प्राणिमात्राना लागू

असलेले नैसर्गिक नियम त्याला देखील बंधनकारक आहेत. ह्या-विरुद्ध कितीहि युक्तिवाद केला तरी अखिल मानवजातीच्या 'प्रवृत्ती' किंवा 'भावना' कांहीं त्यामुळें बदलणें शक्य नाहीं. जगाच्या सर्व व्यवहारांचें नियमन करणारी जी आदिशक्ति—तो ईश्वर असो किंवा 'निसर्ग' असो— जेव्हां मानवजातीला ह्यापुढें अस्तित्वांत राहण्याचें कारण नाहीं असें ठरवील तेव्हां, कुणी सांगावें?, स्त्री-पुरुषांचें परस्परांविषयींचें आकर्षण एकदम नाहींसें होऊन 'पुढें काय?' हा प्रश्नच उरणार नाहीं.

अनंत कालापासून अस्तित्वात असलेल्या व पुढेंहि असावयाच्या मनुष्यजातीच्या प्राण्यांतील प्रजोत्पादनकर्तव्यातील महत्त्वाची जबाबदारी पार पाडणारी मादी हीच 'स्त्री'ची नैसर्गिक भूमिका.

अगदीं अलिकडच्या काळांत क्रांतीच्या मार्गावर असलेल्या, निदान तसें भासणाऱ्या, सामाजिक उत्क्रान्तीच्या स्थितींत—आपला कल निसर्गाला शेवटचें स्थान देण्याकडे आहे. निसर्गा-वर 'विजय' मिळवणें हें कांहीं कठीण नाहीं अशी आपली समजूत होऊं लागली आहे. कदाचित् त्यांत तथ्यांश असेलहि. तशी बढाई मारतांना वास्तविक आपल्या म्हणण्याचा अर्थ 'निसर्गाचें कोडें आपल्याला अधिकाधिक उलगडत चाललें आहे' असा असतो. तथापि 'निसर्ग' ह्या शब्दाचा वेगळा अर्थ करून 'प्रकृतिधर्मा'च्या बाबतींतहि आपण निसर्गाला झिडकारूं शकतों अशी भावना करून घेऊन ह्या प्रमादाबद्दल भरपूर किंमत देत असतों.

प्रजोत्पादनाच्या निसर्गप्रणीत कर्तव्याचें 'ओझें' वाटूं नये या-साठींच कामवासनेची व स्त्रीपुरुषांच्या परस्परआकर्षणाची योजना करण्यांत आली असावी. बुद्धीच्या सर्वस्वीं आहारीं जाऊन मान-

चाला स्वर्ग दोन बोटें उरूं नये एवढ्यासाठींच स्त्री-पुरुषसंबंधांत 'स्वर्गसुख' वाटावें, तेवढ्या बाबतींत तरी मनुष्याला इतर प्राण्यांच्याच पंक्तीला बसायला लागावें ह्यांत वाटलें तर माणसाचें अपूर्णत्व किंवा दौर्बल्य आहे असें म्हणा. पण ह्या दौर्बल्याचा मनापासून तिटकारा करणारे कितीसे मानव आहेत ?

'अमानुष'पणा व 'अतिमानुष'पणा ह्या दोन स्थितींच्या मध्यें 'मानुष'प्राण्याची ओढाताण चाललेली आहे. आणि सुधारणा (civilization) हा 'अतिमानुष' स्थितीकडे जाण्यासाठीं चाललेला प्रयत्न आहे. ह्या प्रयत्नांतच समाजरचनेचें बीज सांपडतें. 'अमानुष' प्रवृत्तींना मुरड घालून किंवा त्याचें नियमन करून—संपूर्णपणें नाहींशा करून नव्हे,— कारण तसें केलें तर अस्तित्वालाच मुकावें लागेल,— अतिमानुष स्थितीकडे आपल्याला जावयाचें आहे. समाजांतील सर्व व्यक्तींना किंवा घटकांना हा प्रवास अखंडपणें चालवितां यावा यासाठीं आचारधर्म किंवा नीतिनियम मनुष्यानेंच निर्माण केले. ह्या मनुष्यप्रणीत नियमाचें उल्लंघन होऊं नये यासाठीं शासनसंस्था व तिचीं विधिमंडळें—मग तीं कोणत्याहि प्रकारचीं असोत— अस्तित्वांत आलीं. आणि मूलतः एकाच ध्येयाचे पण भिन्न अशा स्वरूपांचे असे 'सुधारलेले' निरनिराळे समाज आज जगांत आपल्याला दिसत आहेत.

अर्थातच मूळच्या नैसर्गिक भूमिकेचें अस्तित्व व वास्तविक महत्त्व राखून व समाजव्यवहाराचें नियंत्रण करणाऱ्या मानवप्रणीत नियमांचें बंधन आनंदानें स्वीकारून स्त्रीनें आपली भूमिका परिस्थित्यनुरूप ठरवावयाची आहे.

# पूर्व आणि पश्चिम

"One ship drives east, and another drives west,
With the self-same winds that blow,
'Tis the set of the sails and not the gales,
Which tell us the way they go

*Ella Wheeler Wilcox.*

दिवसाच्या आरंभीं जमिनीकडून समुद्राकडे वारा वाहात असतो आणि संध्याकाळीं समुद्राकडून जमिनीकडे वाहातो. वाऱ्याची दिशा नेहमीं एकच नसते. त्याचप्रमाणें विचाराचे वारे पूर्वेकडून पश्चिमेकडे वाहात होते तो काल जाऊन आता पश्चिमेकडून पूर्वेकडे वाहात आहेत. पण वारा कोणत्याहि दिशेनें वाहात असला तरी ज्याप्रमाणें परस्परविरुद्ध दिशांना जाणारीं गलबतेंसुद्धां नावाड्याच्या कौशल्यानें व शिडाच्या योग्य मांडणीनें आपापला मार्ग आक्रमीत असतात त्याचप्रमाणें आपल्या ध्येयाची दिशा निश्चित असल्यावर, प्रस्तुत विचारप्रवाह अगदीं प्रतिकूल असे असले तरी सामाजिक प्रगति थांबण्याचें कारण नाहीं.

हजारों वर्षांत झाला नव्हता एवढा परिणाम पाश्चात्त्य आणि पौर्वात्य संस्कृतींच्या सध्याच्या संगमामुळें अत्यंत अल्प अशा काळात आपल्या समाजावर झालेला आहे. पाश्चात्य विचाराच्या प्रचंड आक्रमक शक्तीमुळे आपली आतापर्यंतची समाजस्थिती तिच्या सांस्कृतिक पायासकट कोसळून पडते कीं काय अशी भीति आपल्याला भेडसावीत आहे. पण प्रचंड वेगानें वाहणाऱ्या अशा मोठ्या नदीचा प्रवाहसुद्धा शिताफीनें आणि प्रयत्नानें आपल्याला लाभदायक करून घेतां येतो तर प्रतिकूल भासणाऱ्या विचार-

प्रवाहांच्या शक्तीचा देखील आपल्याला उपयोग करून घेतां येणार नाहीं का ? पाश्चात्त्य विचारांच्यामध्यें जी विघातक शक्ती असेल ती आपल्यांतील दोषांवर सोडून त्यांतील विधायक शक्तीचाच आपणास आपल्या हितासाठीं उपयोग करून घेतां येईल.

हा दृष्टिकोन ठेवला तरच सध्याच्या परिस्थितींत आपले सामाजिक प्रश्न आपल्याला हितकारक रीतीनें सोडविता येतील.

दीडशें वर्षांपूर्वी आपल्यांतील सुज्ञ अशा राजकारणधुरंधराना प्रत्यक्ष आपल्या देशाच्या भौगोलिक मर्यादा देखील नीटशा माहीत नव्हत्या, इतकेच नव्हे, तर त्या बाबतींतील त्याचें अज्ञान आज आश्चर्यकारक वाटण्याजोगें होतें हें विसरून चालणार नाहीं. पण त्याच वेळीं सामाजिक जीवनाच्या बाबतींत शेकडों किंवा हजारों वर्षे परकीय आक्रमणातून सुद्धा टिकून राहिलेली समाजरचना त्याना अढळ वाटत होती व सामान्यत. सुखकर भासत होती असें इतिहास सांगतो.

आज तशी स्थिती राहिलेली नाहीं. आपल्या समाजरचनेवर नवीन विचाराचें आक्रमण झाले आहे, आणि व्यक्तिस्वातंत्र्याच्या कल्पनेनें आजवरचीं सामाजिक बंधने भराभर तुटून पडूं लागलीं आहेत.

नुसत्या आकांक्षा वाढल्या आहेत आणि वाढतहि आहेत पण त्या पुऱ्या होण्याची परिस्थिति मात्र नाहीं, यामुळें सध्याचा काळ हा सर्वच दृष्टींनीं 'असमाधानाचा काळ' आहे.

इतकें झालें तरी अजूनहि स्त्री व पुरुष यांच्या आजपर्यंतच्या भूमिकात फारसा फरक पडलेला नाहीं. पुरुषाच्या भूमिकेचा येथें विचार करायचा तो स्त्रीच्या भूमिकेशीं तुलना करण्यापुरताच. स्त्रीच्या

भूमिकेंत अजून फारसा फरक पडला नाहीं ही गोष्ट आंकडेवारीनें सिद्ध करता येईल. आपल्या समाजांतील सुशिक्षितांचें— साक्षर लोकाचे म्हटलें तरी— अशिक्षितांशीं किंवा निरक्षराशीं काय प्रमाण आज आहे?

पण एवढ्यामुळें ह्या प्रश्नाची उपेक्षा करून चालणार नाहीं. उत्क्रांति होत आहे असें म्हणण्यापेक्षा क्रान्ति होत आहे असें म्हणणें अधिक युक्त ठरेल, इतक्या शीघ्र गतीनें नव्या विचाराचें आक्रमण आपल्यावर होत आहे— नुसत्या विचारात नव्हे तर प्रत्यक्ष कृतींतसुद्धां. आणि नवे विचार तपासून स्वीकारणाऱ्यांपेक्षां अंधानुकरण करणाऱ्याचेंच प्रमाण जास्त. तेव्हा सुशिक्षितामध्येच नव्या विचारांचे परिणाम होतात असें म्हणणें चुकीचेंच ठरेल. तसेंच परक्याच्या गुणाचा स्वीकार करण्याची प्रवृत्ति साधारणपणें कमीच. कारण, त्यात आजवरच्या संवयीला सोडून प्रत्यक्ष काहीं तरी करावें लागते. पण दोषाच्या बाबतींत, संसर्गजन्य रोगाचा जसा झपाट्यानें फैलाव होतो, तशीच स्थिती होते.

ज्या कल्पना काहीं वर्षांपूर्वीं पाश्चात्य देशात रूढ होत्या त्या आज 'अद्ययावत्' असें आपण धरून चालतों, त्याचें अनुकरण करण्याचा प्रयत्न करतो. हें अनुकरण पुष्कळ वेळां 'अंधानुकरण' असतें. त्या पाश्चात्य आहेत एवढेंच त्या स्वीकारण्याचे खरें कारण ही गोष्ट कबूल करायला मात्र लाज वाटते म्हणून, व त्याबद्दल योग्य तें समर्थन करण्याचें सामर्थ्य किंवा इच्छा नसल्यामुळे आपण शब्दावडबर माजवून, किंवा उथळ वाद-विवाद करून शेवटीं म्हणतो, 'इतक्या शास्त्रीय दृष्टिकोनाचे पाश्चात्य लोक असं करतात ते काय मूर्ख म्हणून?' पण तर्कशास्त्राच्या, अगदीं पाश्चात्य Logic च्या

दृष्टीनें हें "Argumentum ad hominun" अर्थात् कवडीमोल आहे.

सर्वांत केविलवाणी गोष्ट अशी कीं, ज्या गोष्टींचें आपण आजघटकेला समर्थन करण्यासाठीं धडपडत असतों त्याच गोष्टींबद्दल खुद्द पाश्चात्य देशात संशय उत्पन्न होऊन काहीं काही वेळा त्याची हकालपट्टी होण्याची सुरवात झालेली असते. क्वचित् प्रसंगीं त्या पूर्णपणें नामशेष होऊन वर्षेहि लोटलेली असतात.

याचें कारण असे कीं वर्तमानपत्राच्या व नभोवाणीच्या आजच्या युगातहि पाश्चात्य देशातल्या वैचारिक उत्क्रान्तीचे अस्पष्टसे पडसादसुद्धा आपल्याकडे पोंचायला बराच अवधि लागत असतो. जागतिक विचाराबद्दलची जिज्ञासा आपल्यामध्ये वाटल्याखेरीज हा दोष टाळणें अर्थातच दुरापास्त आहे.

सहशिक्षण सार्वत्रिक करण्यासाठी आपली कोण धडपड चालली आहे. पण सहशिक्षण राहोच, शिक्षणाचा प्रकार देखील स्त्रियांच्यासाठी वेगळा असावा ह्या विचारसरणीला आज पाश्चात्य देशात किती महत्त्व आलें आहे याची आपल्याला माहिती आहे काय ?

आपल्याकडे सांघिक व्यायाम जे मुलाना तेच मुलींना, असा प्रकार झपाटयानें रूढ होत आहे. ह्या बाबतीत आपल्या गुरुमाउलीच्या देशात आज प्रत्यक्ष काय चाललें आहे याची आपल्याला विश्वसनीय माहिती तरी आहे काय ? वेगाने धांवणें, सायकलवर बसणें व लांब उड्या मारणें हें स्त्रियांना अहितकारक आहे ही पाश्चात्य डॉक्टरानीं साधार सिद्ध केलेली गोष्ट आपण कधीं विचारात घेतली आहे काय ?

अशा अनेक गोष्टी दाखविता येतील. बौद्धिक शिक्षणाचा

फाजील ताण पडलेल्या स्त्रियाना वैवाहिक जीवन योग्यप्रकारें पार पाडता येत नाही, अर्थात् प्रकृतीच्या दृष्टीनें, व अशा स्त्रियात प्रसूतिजन्य मृत्युसंख्या (इतर स्त्रियाच्या मानानें) बरीच मोठी असते असें आपल्याकडील डॉक्टर देखील बोलून दाखवू लागले आहेत.

पण आपल्या समाजाची प्रवृत्ति कुणीकडे आहे ?

कोणत्याहि कारणानें का होईना, पण आपल्या समाजाच्या दृष्टीनें काय हितावह होईल याचा विचार करून त्या मार्गाचा अवलंब करण्याच्या मनःस्थितीत आपण आज नाहीं हेच खरें. पाश्चात्त्यांशी घडून आलेला आपला संबंध, आमच्यातील अंधश्रद्धा आणि स्वतःच्या हिताहिताचा विचार करण्याबाबतचे औदासीन्य घालवूं शकला नाही. फक्त आपलें 'प्रमाण' बदललें. पूर्वी आपल्या रूढींवर व धर्मकल्पनावर आपण विसबून राहात होतों, आतां पाश्चात्त्य वाटणाऱ्या विचारावर आपण अवलंबून आहोत एवढाच फरक. आपला धनगर बदलला आहे पण आम्ही आहोत मेंढरेंच.

* * *

केवळ बुद्धिनिष्ठ विचारापेक्षा भावनाचा किंवा आपल्याला मनापासून काय वाटतें ह्याचा आपल्या जीवनक्रमावर नियंत्रक परिणाम अधिक होत असतो. एका दृष्टीनें भावना ह्या विचारापेक्षां अधिक व्यापक असतात. मनात उद्भवणारे विचार, आणि बाह्य जगाचे ज्ञान यांच्याबरोबर नैसर्गिक प्रवृत्तीचा संगम होऊन आपल्या भावना बनत असतात. कुणालाही 'एकाद्या बाबतींत तुमचे विचार काय आहेत?' असें विचारण्यापेक्षां 'तुमच्या भावना काय आहेत?' असा प्रश्न केला तरच, मला वाटतें, आपल्याला खरें— म्हणजे त्या व्यक्तीच्या मनांतलें— उत्तर मिळण्याचा अधिक संभव

आहे. एक तर विचाराला शेवट नाहीं, आणि दुसरे असें कीं कोणालाहि आपले विचार 'मागासलेले' असावे– निदान लोकाना तरी तसें वाटावें– असें वाटत नाही. पण व्यवहारात किंवा आपल्या जीवनक्रमात मनुष्य नेहमी आपल्या विचारापेक्षा आपल्या भावनाना व प्रवृत्तींना अधिक महत्त्व देत असतो. म्हणूनच सामान्य स्त्रीच्या वास्तविक भूमिकेबद्दल काही अधिकारी व्यक्तींना मी प्रश्न विचारले ते त्याच्या विचारापेक्षा त्याच्या भावना किंवा त्याना काय वाटतें, तें समजून घेण्याच्याच दृष्टीनें.

जी उत्तरें मला मिळाली तीं जशीच्या तशीच मी येथे देत आहें.

'निसर्गप्रणीत कर्तव्यानुसार स्त्री आणि पुरुष याच्यामध्यें प्रमुख जीवनकार्याची जी वाटणी होऊन राहते ती आखीव, रेखीव आणि कायम स्वरूपाची असते. एवढेच नव्हे तर या कार्यविभागणीला अनुकूल म्हणूनच निसर्गानें त्याच्या देहाच्या व मनाच्या गुणधर्मांना सर्वसाधारणपणे वेगळेपणा ठेविला असावा. या कारणाने सामान्यत: प्रजोत्पादन, व तदनुषंगिक गोष्टी– शिशुसंगोपनादि– हे स्त्रीचें पहिलें कर्तव्यक्षेत्र. हें कर्तव्य पार पाडण्याच्या आड येईल असे कोणतेहि ध्येय सामान्य स्त्रीने ठेवता कामा नये. ह्या कर्तव्याशीं सुसंगत अशी एकच भूमिका आहे. ती म्हणजे गृहिणीची. ह्या भूमिकेवरून तिला पृथ्वीचा स्वर्ग बनविता येईल राजकारण, देशाभिमान, शौर्य वगैरे गोष्टीमध्यें इतिहासात कांही स्त्रियानी आपलीं नावें अजरामर केलेली आहेत. पण तीं उदाहरणें असामान्य स्त्रियाचीं व अपवादात्मक आहेत. त्याचा अर्थ इतकाच की वेळ पडल्यास अशा गोष्टीतहि स्त्रिया पुरुषाइतकीच कार्यक्षमता क्वचित् प्रसंगीं दाखवूं शकतात. पण त्याची नैसर्गिक

प्रवृत्ति तशी नाहीं. प्रवृत्ती ध्यानांत घेतल्या तर स्त्रीपुरुषांच्या कार्यक्षेत्राची सर्रास अदलाबदल करणें इष्ट होईल असें वाटत नाहीं.'

श्री. न. चिं. केळकर

'संसारातील महत्त्वाचा भागीदार या नात्यानें स्त्रीवर ज्या जबाबदाऱ्या पडतात त्या पार पाडण्यासाठीं अवश्य तें ज्ञान-विज्ञान व त्यासाठीं योग्य अशा प्रकारचें बौद्धिक शिक्षण प्रत्येक स्त्रीला मिळणें अवश्य आहे. ह्याबाबत मतभेद असण्याचें मुळीच कारण नाहीं. निसर्गप्रणीत जबाबदाऱ्या पार पाडून इतर गोष्टी— समाजसेवा, राष्ट्रकार्य इत्यादि गोष्टी— विशेषतः पोक्तपणी स्त्रियानीं अंगीकारण्याला काहीच हरकत नाही. शेकडा नव्वदापेक्षा जास्त स्त्रिया 'माता व गृहिणी' हीच भूमिका मनापासून इच्छितात. शैक्षणिक पोपटपचीमुळे 'समाजकार्या'बद्दलचे बोलणे काही स्त्रियाच्या तोडून आपण ऐकतों. एक तर अशाची संख्या फारच थोडी व त्यापैकी बहुतेकाना अशा कार्याबद्दल तितकीशी अंतरींची तळमळ नसते. ज्याना खरोखरीच तशी तळमळ असेल त्याना तशी संधि मिळाला पाहिजे खासच. पण त्याच्या कार्यक्षमतेला देखील नैसर्गिक व परिस्थितीजन्य मर्यादा आहेतच. ' प्रा. वा. म. जोशी

'स्त्री ही बुद्धिमत्तेनें पुरुषाची बरोबरी करते हें हजारदा सिद्ध झालेलें आहे. अर्थात् मानव्याच्या विकसनाला तिच्या बुद्धिमत्तेचा उपयोग न होण्यासारख्या स्थितीत तिला ठेवणें व तिनें रहाणें हें एकंदरींनें पाहता मनुष्ययोनीच्या नुकसानीचेंच ठरणार आहे. पण जातिसातत्य टिकविण्याची जी वासना स्त्रीला व पुरुषाला आहे तिच्या व्यापाराचा मुख्य भार स्त्रीवरच पडतो. सृष्टीनें स्त्रीच्या देहाची रचनाच अशी केली आहे. भावी पिढी आपल्या शरीरांत

धारण करणें, वाढविणें, व ती जन्मल्यावर पोसणें हीं कामें स्त्रीनेंच केलीं पाहिजेत असा लेख सृष्टीनें स्त्रीच्या देहावरच लिहिला आहे. अमुक एका वयानंतर पुरुषाला ज्याप्रमाणे पितृपदाची वासना उत्पन्न होते त्याप्रमाणेंच एका विशिष्ट वयानंतर स्त्रीला मातृपदाची वासना होते. हट्टानें ही वासना मारणारी स्त्री एकादी भेटेल. सरसकट स्त्रीजात मातृत्वाची भोक्तीच रहाणार आहे. असें आहे तर स्त्रीच्या जीविताची तऱ्हा पुरुषाच्या जीविताच्या तऱ्हेवर जाऊन चालेल असे वाटत नाही. म्हणजे स्त्रीकडून पुरुषाच्या शरीरकष्टाचें काम करून घेणे किंवा पुरुषाप्रमाणें बौद्धिक कामाच्या सातत्याची तिच्याकडून अपेक्षा करणें चूक आहे असें मला वाटते. हें खरें असलें तरी स्त्रीच्या बुद्धिव्यापाराला मुबलक संधी मिळणें हें अत्यवश्य आहे, व यासाठीं तिच्या कौमार्यांत ज्ञानसंपादनचा संस्कार तिजवर होणे हेंही अवश्य आहे. बालविधवेलाहि चिरकाल संयम टिकविता येतो असें ज्या समाजाला माहीत आहे त्याला कौमार्याचीं चारदोन वर्षे वाढलीं तरी स्त्रिया व्रतस्थ राहतीलच राहतील हे पतकरवयास काहीच हरकत पडूं नये. याचा अर्थ असा कीं मुलींना ज्ञानार्जनाची उत्तम संधी द्यावी, पुढें मुलींनीं लग्न अवश्य करावें; स्त्रियाना पुरुषी शरीरकष्टाची कामें कोणत्याही तत्त्वज्ञानाप्रमाणेंसुद्धा लावूं नयेत; आणि त्याच्या बुद्धिव्यापाराला पूर्ण वाव ठेवून त्याचा फायदा मानवी प्रगतीला अवश्य करून घ्यावा.'

**प्रा. श्री. म. माटे**

वर दिलेले विचार ज्यांचे आहेत त्या सर्व व्यक्ती विश्वविद्यालयीन शिक्षणक्रम उत्तम प्रकारें संपवून आयुष्यातील जबाबदाऱ्या यशस्वी रीतीने पार पाडीत आहेत. आपापल्या कर्तव्यक्षेत्रांत

त्यांनीं आपलें नांव आदरणीय करून ठेवलें आहे. जगाच्या इतिहासाचें व आपल्या समाजाच्या व्यवहाराचे चौकस दृष्टीनें परिशीलन केल्यानतर सामान्य स्त्रीच्या भूमिकेविषयी त्याच्या भावना वरीलप्रमाणें झालेल्या आहेत ही गोष्ट फार महत्त्वाची आहे.

तथापि, ह्या विचारांशीं सहमत नसणारा, किंबहुना ह्या प्रकारची भावना ठेवणें हें स्त्रियाच्या दृष्टीनें अपमानकारक आहे असें मानणारा, वर्ग आपल्या समाजामध्यें निश्चितपणे दाखविता येईल. पुरुषांच्या बरोबरीने व पुरुषाना मिळतें तसलेच शिक्षण मिळाल्याकारणानें ज्याच्या स्वतःविषयीच्या कल्पना आणि आकाक्षा बेसुमार वाढलेल्या आहेत अशा काही पदवीधर स्त्रियाचा व त्याच्या दृष्टिकोनाचे विकृत अनुकरण करून विनाकारणच आपल्या जिवाचे 'रान' करून घेणाऱ्या अर्धवट बुद्धीच्या तरुण मुलींचाच भरणा ह्या वर्गात विशेष आहे. स्त्रीदाक्षिण्याच्या खोटया कल्पनामुळे वस्तुस्थितीकडे डोळेझाक करणाऱ्या बऱ्याच तरुणाचे व स्त्रियाना हरभऱ्याच्या झाडावर चढविण्यातच आयुष्याची इतिकर्तव्यता मानणाऱ्या कांहीं भोळसट वृद्धाचेंहि ह्या संप्रदायाला नैतिक (?) पाठबळ असतें.

सुमाता व सुगृहिणी ही **सामान्य** स्त्रीची भूमिका ज्या सुशिक्षित स्त्रियांना समत होत नाहीं त्यापैकी फारच थोड्या वास्तविक बौद्धिक दृष्टया 'असामान्य' असतात. ज्या खरोखरच असामान्य असतात त्यांनीं ही सामान्य भूमिका सोडून व त्यासाठी आदरणीय असा स्वार्थत्याग करून एकादें बौद्धिक उन्नतीचें— पोटभरू शिक्षकिणींचे नव्हे—, शास्त्रीय संशोधनाचें किंवा सार्वजनिक हिताच्या समाजसेवेचें कार्य अंगीकारलें तर त्यांत कोणाला देखील वावगें वाटणार

नाहीं. मात्र तारुण्याच्या ऐन वसंतऋतूत चमकणाऱ्या समाज-सेविकेच्या प्रत्यक्ष समाजसेवेपेक्षा तिच्या उन्मादक शरीरसंपत्तीकडेच समाजातील पुरुषाचें लक्ष अधिक वेधल्याकारणाने व तिच्यातील स्त्रीत्व संपूर्णपणें नष्ट झालेलें नसल्याकारणाने अंगीकृत कार्यांत तिला अनेक प्रकारच्या अडचणी अनुभवाला येणें अगदी संभाव्य आहे. पण तेंच कार्य, निसर्गानें सोपविलेली जबाबदारी आस्थेनें व तन्मयतेनें पार पाडल्यानतर, 'पोक्त'पणी स्त्रीनें हाती घेतलें तर तें अधिक यशस्वीपणें तडीस नेता येणें शक्य असतें.

पण– आपण असामान्य आहोंत अशी भ्रामक समजूत करून घेऊन भलभलते उपद्व्याप करण्यात आपल्या जीवनांतला अत्यत महत्त्वाचा काल दवडल्यामुळें पस्तावलेल्या स्त्रियांची असंख्य उदा-हरणें आपल्या समाजात आज दाखविता येतील. निसर्गासारखा निष्ठुर न्यायाधीश योग्य ती शिक्षा त्यांना दिल्याखेरीज राहात नाही, आणि मग आपल्या अंतरींच्या वडवानलाचा भडका पुरुषद्वेषाच्या दांभिक बडबडीनें जगावर उघडा करून उरलेंसुरले आयुष्य स्वतःच्या आणि इतराच्या आयुष्याचा खेळखंडोबा करण्यात घाल-विण्याची पाळी त्याच्यावर येत असते. अशाप्रकारें झपाटलेल्या चंडिकेच्या तावडींत सापडलेल्या अनेक निष्पाप, अज्ञानी तरुणी-च्या आयुष्याची राखरांगोळी झालेली आपल्याला पाहावयास सांपडते. दुर्दैवाची गोष्ट अशी कीं असल्या 'असतुष्ट पिशाच्चा'ना आपल्या समाजांतील तरुणीच्या व अल्पवयी मुलीच्या मार्गदर्शका-ची भूमिका मोठ्या आदराने आणि अभिमानानें आपण बहाल करीत असतो.

यापेक्षां जरा वेगळी जात म्हणजे आर्थिक स्वातंत्र्याच्या अट्टा-

हासानें आपल्या खऱ्या भूमिकेकडे अंशतः किंवा पूर्णपणें दुर्लक्ष करणाऱ्या विवाहित स्त्रीची. एक प्रकारचा प्रच्छन्न स्वार्थ हेंच अशा स्त्रियाच्या जीवनक्रमाचें नियंत्रक तत्त्व असतें. गृहमंदिराची चुटकीसरशी धर्मशाळा किंवा खाणावळ बनवून मुख्य जबाबदारी ती टाळीत असते. आपल्या स्वतंत्र किंवा स्वैर वागण्यात व्यत्यय येईल या भीतीनें ती मातृपद चुकविण्याची पराकाष्ठा करते. ह्या अनैसर्गिक प्रयत्नात— जे उघडकीस आले तर कारागृहवास पत्करावा लागेल असे— अनेक सामाजिक व नैतिक गुन्हे करायला ती प्रवृत्त होते. मानवी न्यायपद्धतीला चकविण्यात यश आलें तरी केव्हा केव्हा निसर्गाच्या न्यायमंदिरात तिला देहान्ताची शिक्षा मिळाल्याखेरीज राहत नाही. अशा स्त्रीच्या मनोभूमिकेचे मानसशास्त्रदृष्ट्या परिशीलन केलें तर असें दिसून येईल कीं आपल्यांतील स्त्रीत्वाचा अजाणतेपणे ती नाश करीत असून पुरुषाच्या भूमिकेवर आरूढ होण्याचा यत्न करीत असते. पण निसर्गावर विजय मिळवणे सोपें नाही. अशा प्रयत्नातून धड स्त्री नाही व धड पुरुष नाहीं असा स्त्रीदेहधारी पण तृतीयपंथी विचित्र प्राणी निर्माण होतो, आणि वास्तविक ज्या ठिकाणीं नंदनवन असावयास पाहिजे त्या ठिकाणीं सहाराचें रखरखीत वाळवंट निर्माण होतें. अशा प्रकारचे सुशिक्षिताचे 'दुर्दैवी संसार' आज वाढत्या प्रमाणात पाहावयाला मिळतात.

विवाहसंस्थेविरुद्ध अनेक प्रकारचे युक्तिवाद व तथाकथित तत्त्वें आज पुढें माडण्यांत येतात. पण या बाबतींत अतिशय तीव्रतेनें परिवर्तन पावूं लागलेले पाश्चात्याचे विचार लक्षांत घेण्यासारखे आहेत. "मुलांना जन्म देणें एवढ्यावरच माता-पित्याची नैसर्गिक

जबाबदारी संपत नाहीं. त्याचें संगोपन राष्ट्रानें करावें ह्या म्हणण्याच्या मुळाशीं एक मोठाच गैरसमज असतो. 'अन्न-वस्त्र आणि राहण्यासाठीं घर' एवढ्यात संगोपन शब्दाचा अर्थ पूर्ण होत नाहीं. ह्या आवश्यक गोष्टीबरोबरच 'भावनां'ची जोड देखील मिळावी लागते; आणि भावना काहीं विकत किंवा उसन्या घेता येत नाहींत." (Kenneth Walker. Physiology of Sex.) स्वत:च्या मुलाची आबाळ करून बौद्धिक शिक्षणाच्या मागें लागणाऱ्या किंवा कारण नसताना नोकरी करणाऱ्या स्त्रियाची भूमिका वरील विचाराच्या आधारें पडताळून पाहणें जरूर आहे.

तथापि आतापर्यंत केलेलें विवेचन थोडेंफार एकांगी किंवा एकतर्फी आहे असे वाटण्याचा संभव आहे. याखाली दिलेले सौ. कमलिनीबाई दामले, एम् ए.,बी.टी., याचे विचार ह्या प्रश्नाची दुसरी बाजू म्हणून महत्त्वाचे आहेत.

'सामान्य स्त्रीबद्दलच्या बहुजनसमाजाच्या अपेक्षा अगदींच आकुंचित व एकागी असतात. वैवाहिक जीवन व त्याच्याबरोबर येणाऱ्या गृहव्यवस्था, अपत्यसंगोपन वगैरे कौटुंबिक जबाबदाऱ्या पार पाडणे हीच तिची इतिकर्तव्यता समजली जाते. गृहसौख्याच्या दृष्टीनें अधिक विचार करणारे थोडेंसें पुढें जाऊन म्हणतात कीं ही जबाबदारी उत्तम रीतीनें पार पाडण्यासाठीं त्याबाबतचें शिक्षण तिला असणें अवश्य आहे. पण याच्यापलीकडे तिनें आपल्या अंगच्या गुणांचा विकास किंवा उपयोग करण्याचें साहस मात्र करूं नये; तें समाजहितास हानिकारक होय.

ज्या समाजाच्या धारणेसाठीं व कल्याणासाठीं अशी विषम श्रमविभागणी केलेली आहे तो स्त्रीपुरुषांमधील नैसर्गिक गुणधर्मांचा

विचार करून उभारलेला आहे का? सामान्य स्त्रीच्या मनाची ठेवण व आचारविचाराची दिशा ही बहुताशी प्रचलित समाज-रचना व तिच्याबद्दलच्या समाजाच्या अपेक्षा यावर अवलंबून असतात हें खरें आहे. तेव्हा सामान्य स्त्रीला संसार व मुलें यांची ओढ असलेली दिसते असे म्हणावयास हरकत नाही. पण बारकाईने संशोधन केल्यास कितीतरी स्त्रिया ही कामगिरी अंगाबाहेर टाकण्यास तयार होतील. लोकमताचें दडपण नसेल तर स्त्रियांच्या खऱ्या आवडीनिवडी आपल्या नजरेस येतील. अपत्यप्रेम किंवा वात्सल्य ही भावना स्त्रीपुरुषांना दोघानाही असते, तेव्हा तिच्या पूर्तीसाठीं स्त्रियावर अधिक भार टाकण्याचे कारण काय? तसेंच गृहसौख्य दोघानाही प्रिय असतें, मग गृह-विज्ञानाची माहिती व गृहव्यवस्थेची जबाबदारी दोघावरही सारखी नको काय? केवळ निसर्गानें प्रजोत्पादनाचे काम स्त्रियावर सोपवले आहे म्हणून त्या निमित्तानें त्याना आपल्या वैयक्तिक आशा-आकांक्षा यावर पाणी सोडायला लावावे काय?

स्त्रियाच्या कार्यक्षेत्राची मर्यादा त्याच्या वैयक्तिक आवडीनिवडी-वर व कर्तृत्वावर अवलंबून असावी. समान हक्काच्या व सहकार्याच्या तत्त्वावर उभारलेल्या समाजात सामान्य स्त्रीलाही सामान्य पुरुषाच्या बरोबरीनें समाजकार्य करण्याची व आपल्या व्यक्तित्वाचा विकास करण्याची संधि मिळेल. सामान्य स्त्रीलासुद्धा ज्या समाजात, केवळ कुटुंबाची एक घटक म्हणून नव्हे तर स्वतंत्र व्यक्ति म्हणून, स्थान मिळेल व सांस्कृतिक दर्जा असेल तोच खरा 'मानवी' समाज होय."

**सौ. कमलिनीबाई दामले**

वरील विचार शास्त्रीय भूमिकेवरून व थोड्याफार ध्येयात्मक

दृष्टीनें माडलेले दिसतात. यापूर्वी उद्धृत केलेल्या तीन उताऱ्यांशीं ते कांहीसे विरोधी वाटण्याचा संभव आहे. तथापि सूक्ष्म विचार केल्यानंतर आणि विशेषतः सौ. दामले यानी आपल्या विचाराना जें शास्त्रीय भूमिकेचें पाठबळ घेतलेलें आहे ते ध्यानात घेतल्या-नंतर ह्या विरोधाची तीव्रता कमी होऊ लागेल. स्त्रीपुरुषामधील 'नैसर्गिक' गुणधर्मांचें महत्त्व त्यानी मान्य केले आहे, इतकेंच नव्हे तर त्या गुणधर्मावरच स्त्रीपुरुषाची कार्यक्षेत्रें निश्चित करण्यात आली पाहिजेत असाच त्याचा आग्रह आहे. समाजहिताच्या दृष्टीनें विचार करता व्यक्तिविकासाला योग्य तो वाव मिळाला पाहिजे ही गोष्ट निर्विवाद आहे. स्त्रियाच्या कार्यक्षेत्रांची मर्यादा त्याच्या वैय-क्तिक आवडीनिवडीवर अवलंबून असावी हेहि योग्यच आहे. पण आवडीनिवडी म्हणजे काय ?

आज कोणत्याहि समाजाकडे पाहिलें तर तो पूर्णावस्थेला पोच-लेला दिसणार नाही. "Old order changeth yielding place to new" हें तत्त्व प्रत्येक समाजाला सर्वकाल लागू असतें. सामाजिक व्यवहारांचें असे एकहि दालन आपल्याला सापडणार नाही कीं त्यामध्यें समाज पूर्णावस्थेला पोचला असून कायम स्वरूपाची योजना उपलब्ध झाली आहे. स्त्रीच्या कार्यक्षेत्राच्या बाबत सुद्धा हाच नियम लागू पडतो. आजघटकेला जगाच्या पाठी-वर एकंदरींत स्त्रीची भूमिका 'गृहिणी व माता' हीच मुख्यतः आहे ही गोष्ट निर्विवाद आहे. पुरुषानीं आपल्या सामर्थ्याच्या जोरावर स्त्रियांना आजवर गुलामगिरींत टाकलें आहे हें म्हणणें, थोडासा विचार केल्यानतर, तितकेंसें संयुक्तिक वाटणार नाहीं. Survival of the fittest हें तत्त्वच ह्या सर्वसामान्य परिस्थितीच्या मागें

नसेल कशावरून ? इतिहासाकडे पाहिलें असतां कांहीं कांहीं देशात विशिष्ट काळीं स्त्रिया– अर्थात् सर्वच नव्हे– पुरुषांच्या बरोबरीनें बौद्धिक क्षेत्रात वावरत असलेल्या दिसून येतात. पण ती समानता पुढें का टिकूं व वाढू शकली नाहीं ?

व्यक्तिविकासाविषयी विचार करीत असताना पुष्कळ वेळा व्यक्ती ही समाजाचा एक घटक आहे व समाजांत राहूनच तो विकास साधावयाचा आहे हें आपण विसरतो. व्यक्तिविकासाला जें सामाजिक व्यवहाराचें बंधन किंवा मर्यादा आहेत त्या डोळ्याआड करून चालणार नाहीं. ही बंधनें व मर्यादा स्त्री व पुरुष ह्या दोघांनाहि सारखींच निर्णायक राहणार. व्यक्तिविकास हा समाजव्यवहाराशीं विसंगत होऊं लागला, त्याच्यामागें लागल्यामुळें जर विषमता निर्माण होऊ लागली तर समाजाकडून प्रतिक्रिया होणार हें ठरलेलेंच आहे. 'स्वतंत्र घटक' ह्याचा अर्थ मर्यादितच राहणार. समाजामध्यें कुणीहि व्यक्ती संपूर्णपणें **स्वतंत्र** राहूं शकणारच नाहीं. आवडीनिवडी देखील समाजाला पचतील अशाच आहेत तोंपर्यंतच त्याचा बोज राखला जाईल. पण जर का त्याच्यापासून समाजाला उपसर्ग पोचूं लागला, व्यक्ती आपल्या सामान्य कर्तव्यांपासून च्युत झाल्याकारणानें समाजस्वास्थ्याला धक्का बसू लागला तर जिवंत समाज त्याला विरोध करणारच. एकाद्या व्यक्तीच्या विशिष्ट कार्यापासून समाजाचें हित साधत असेल तर समाज आपण होऊन त्याला तसें स्वातंत्र्य द्यायला तयार होईल, इतकेंच नव्हे तर त्याचा सन्मानहि करील. थोडक्यांत, आवडनिवड म्हणजे लहरी किंवा बेजबाबदार प्रवृत्ती नव्हेत. व्यक्तिस्वातंत्र्य आणि आवडीनिवडी याचा अर्थ व्यक्तीपुरता अतिविस्तृत असा असला तरी

समाजाच्या दृष्टीनें तो मर्यादित असाच असतो.

पूर्वीपेक्षा एकंदर जगाचें पाऊल सुधारणेच्या दृष्टीनें पुढें पडलें आहे व पडत आहे ही गोष्ट सध्याच्या सर्वनाशक युद्धपरिस्थिती-तहि मान्य करतां येण्यासारखी आहे. पण स्त्रीस्वातंत्र्याचे केंद्र मानल्या जाणाऱ्या अमेरिका देशात 'वीस वर्षांपूर्वी पदवीधर किंवा कॉलेजचें शिक्षण घेणाऱ्या स्त्रिया संपूर्ण स्वातंत्र्याच्या भोक्त्या होत्या, नाट्य चित्रपटादि ललितकलाच्या क्षेत्रात उडी घेण्याची प्रवृत्ती त्याच्यामध्यें बलवत्तर होती, पण आज ती प्रवृत्ती जाऊन गृहिणी-पदाची (house-wife) आकांक्षा त्या बाळगू लागल्या आहेत' ही Stephen Leacock–स्टीफन लीकॉक– ह्या, विनोदी लेखक व अर्थशास्त्रज्ञ म्हणून प्रसिद्ध असलेल्या लेखकानें "Too Much College" ह्या पुस्तकांत उल्लेख केलेली गोष्ट लक्षात घेण्या-सारखी खासच आहे. एखादी व्यक्ती ज्याप्रमाणे एखाद्या तात्कालिक लहरीला बळी पडून नेहमीच्यापेक्षा वेगळ्या अशा विशिष्ट पद्धतीनें वागूं लागते व नंतर पुनः मूळपदावर येते त्याचप्रमाणें समाज देखील काही काल विशिष्ट प्रवृत्तींच्या आहारी जाणें संभवनीय असतें व ती परिस्थिती, कोणत्याहि कारणानें का होईना, असह्य झाली म्हणजे आपोआपच पुनः मूळपदावर येऊं लागतो. ज्या गोष्टी अनुभवानें योग्य व टिकाऊ ठरतात त्या समाजात दृढमूल होतात व इतर गोष्टी थोड्याफार कालानंतर नामशेष होत असतात. ध्येया-त्मक प्रगतीपेक्षाहि समाज आपल्या स्वास्थ्याला अधिक महत्त्व देत असतो. तत्त्वज्ञान आणि शास्त्रीय (भौतिक) ज्ञान याच्यामध्यें जसजशी प्रगति होत जाईल आणि ह्या दोहोंचा सुंदरसा संगम किंवा समन्वय होईल तसतसें कोणत्या गोष्टी चिरंतन हिताच्या

हें ठरविणें समाजाला सोपें होईल आणि अशा गोष्टींचा स्वीकार करायला तो उत्सुक होईल.

वरील गोष्टी लक्षात घेता सौ. दामले यानी मांडलेले विचार व त्यामागील शास्त्रीय भूमिका हीं विशिष्ट प्रकाराच्या मतप्रणालीची निदर्शक आहेत व प्रत्यक्ष वस्तुस्थिती काय आहे यापेक्षा ती कशी असावी अशा ध्येयात्मक दृष्टीचाच त्यानीं अवलंब केला आहे असें दिसून येईल. त्यानी गृहीत धरलेली समान हक्काची व व्यक्ति-स्वातंत्र्याची शक्यता आणि तीवर आधारलेल्या समाजरचनेची संभाव्यता ह्या गोष्टी समाजशास्त्रज्ञानी ठरवावयाच्या आहेत.

संसारात पुरुषाच्या बरोबरीचा, किंबहुना अधिक महत्त्वाचा, जोडीदार ह्या नात्यानें स्त्रीला अवश्य असे ज्ञान व त्यासाठीं शिक्षण मिळणें हा तिचा जन्मसिद्ध हक्कच आहे. पण त्या दृष्टीनें 'अवश्य' असे ज्ञान सध्याच्या शिक्षणक्रमातून मिळते कीं काय हा अत्यंत महत्त्वाचा प्रश्न आहे मुंबई विश्वविद्यालयाच्या प्रवेशपरीक्षेला (Matriculation) बसणाऱ्या मुलींपैकी गृहशास्त्र (Domestic Science) घेणाऱ्या मुलींची संख्या किती अल्प आहे ही गोष्ट विचार करण्यासारखी आहे. पुरुषाचें व स्त्रीचें कर्तव्यक्षेत्र एकच अशी भ्रामक कल्पनाच त्याच्या मुळाशी आहे हे उघड आहे. ह्या बाबतींत समाजातील जबाबदार व्यक्तींनीं डोळसपणानें प्रयत्न केल्याशिवाय विद्यमान परिस्थितीत व शिक्षणखात्याच्या भ्रममूलक व बेजबाबदार धोरणात फरक होणे शक्य दिसत नाही.

वरील गोष्टी या ठिकाणीं मांडण्याचें कारण एकच की सध्याच्या विशिष्ट प्रवृत्ती **सामान्य** स्त्रीच्या भूमिकेला कितीशा हितकर आहेत याबद्दल आपण विचार केला पाहिजे. मानवी जीवनक्रमाचे

निसर्गप्रणीत वेळापत्रक चुकवून, प्रजोत्पादनाला अत्यंत अनुकूल असलेला आयुष्याचा काळ अविचाराने भलत्याच गोष्टींत दवडून स्त्रीला समाज-सातत्यरक्षणाची जबाबदारी नीटपणें पार पाडतां येईल की नाहीं ह्या गोष्टीचा निर्णय मुख्यतः वैद्यकशास्त्रानें करावयाचा आहे.

'हिंदुस्थानांतील स्त्रियाचा ऋतुप्राप्तीचा काल साधारणतः वयाच्या चौदाव्या वर्षी येतो. त्यानंतर चार पाच वर्षांनी ती मातृ-पदाला योग्य होते, आणि वयाच्या बाविसाव्या वर्षापर्यंत तिच्या शरीराची स्थिति प्रसूतीला अनुकूल अशी राहते. त्याच्यापुढे जनन-क्रियेंत उपयोगांत येणाऱ्या इंद्रियांमध्यें व स्नायूमध्यें एका प्रकारचा घट्टपणा (rigidity) येऊन प्रसूति-क्रिया त्रासदायक व अधिक धोक्याची होते. या गोष्टीचा दुष्परिणाम स्त्रीला व जन्माला येणाऱ्या अर्भकाला भोगावा लागतो. वयाच्या विसाव्या वर्षापर्यंतच प्रथमप्रसूति झाली तर पुढील प्रसूती सुलभ होतात. योग्य काली प्रसूति झाली तर प्रजा देखील सुदृढ अशीच होते प्रमाणाबाहेर बौद्धिक शिक्षणाचा किंवा कामाचा सामान्यतः स्त्रियाच्या जनन-क्षमतेवर अनिष्ट परिणाम होतो' असें वैद्यकशास्त्रानें थोडक्यात वरील प्रश्नाचें सर्वसंमत उत्तर दिलेलें आहे.

'माता व गृहिणी' अशी नैसर्गिक आणि सामाजिक भूमिका पत्करणाऱ्या स्त्रीनें आपल्या आयुष्यांतील इतर तपशिलाचे प्रश्न परिस्थित्यनुरूप सोडवावयाचे आहेत. पण ह्या दोन भूमिकांना अवश्य असणारी शारीरिक व मानसिक पात्रता तिनें दृष्टीआड करून केव्हाहि चालणार नाहीं. समाजाचें सुख व स्वास्थ्य हें त्यांतील घटकांच्या— व्यक्तींच्या— सुख-स्वास्थ्यावर अवलंबून असतें.

स्वत:चें घर स्वच्छ आणि निरोगी ठेवणारा मनुष्य अप्रत्यक्षपणें सामाजिक आरोग्य आणि स्वास्थ्य सांभाळण्याच्या कामीं महत्त्वाचें साह्य करीत असतो.

केवळ तात्त्विक दृष्टीनें विचार करावयाचा असेल तर प्रत्यक्षा-बरोबरच संभाव्याचा देखील विचार करणें अनिर्वाह्य असतें. पण व्यावहारिक दृष्टीला प्राधान्य द्यावयाचें असेल तर संभाव्यापैकीं दूरत: संभाव्य गोष्टीविषयींच्या विचाराना मर्यादा घालणें अवश्य होतें. ही मर्यादा न घातली तर नकळतांच आपण तत्त्वज्ञानाच्या प्रांतात प्रवेश करतो, व मग आपली व्यावहारिक विचाराची भूमिका सुटण्याचा बराच संभव असतो. केवळ तात्त्विक चर्चा हें ह्या पुस्तकाचे उद्दिष्ट नसल्यामुळें सामान्य स्त्रीच्या भूमिकेबद्दलचे आज-घटकेचे सामान्यत: सर्वसमत विचार आणि त्यामागील शास्त्रीय भूमिका याचे थोडक्यात दिग्दर्शन केले आहे. साऱ्या मानवजातीला यन्त्रांचा दर्जा आणून, स्त्री व पुरुष याच्यामधील नैसर्गिक भिन्नता मुद्दाम दृष्टीआड करून आत्यंतिक समानतेच्या तत्त्वावर समाजाची यशस्वी व टिकाऊ रचना करता येईल की काय ह्या प्रश्नाचें विश्वसनीय उत्तर अद्याप मिळावयाचें आहे.

---

# सौंदर्य

माझ्या एका मित्रानें आपल्या सहा महिने वयाच्या मुलीबद्दल एक विशेष अनुभव मला सांगितला. ती मुलगी एकदा पाळण्यांत रडत पडलेली असताना त्याच्याकडे नव्यानें आलेला एक पाहुणा आपल्या बासरीवर एक गाणें वाजवूं लागला. दुसऱ्याच क्षणीं त्या मुलीचें रडणें बंद झालें. तिला दिसणार नाहीं अशा ठिकाणीं उभें राहून बांसरीच्या स्वराचा तिच्यावर कसकसा परिणाम होतो ह्या गोष्टीचें माझ्या मित्रानें बारकाईनें निरीक्षण केले. आरंभीं अगदीं स्वस्थपणें ती स्वर ऐकूं लागली. नंतर हसूं लागली व मग आनंदाने हातपाय नाचवूं लागली. बासरी ऐकूं येत होती तोंपर्यंत ती ह्याच स्थितींत होती आणि जेव्हा बासरी बंद झाली तेव्हां ती अस्वस्थपणें इकडे तिकडे पाहूं लागली व नंतर पुन: रडूं लागली. पुन: बासरी वाजूं लागतांच ती पूर्ववत् हसूंबागडूं लागली. तिच्या रडण्यावर एक खात्रीचा उपाय माझ्या मित्राला सापडला.

बासरीच्या स्वरांप्रमाणेंच त्या मुलीला चित्राचे, विशेषत: रंगीत चित्राचें, मनस्वी वेड आहे. भिंतीवर टांगलेल्या अनेक चित्रांपैकी जी रंगाच्या दृष्टीनें खरोखर चांगलीं आहेत अशा चित्रावर झडप घालण्यासाठीं ती टपलेली असते, आणि बासरीचे स्वर ऐकताना तिची वृत्ति जशी तन्मय होऊन जाते तशीच स्थिति रंगीत चित्रांच्या दर्शनानें तिची होते.

अशा प्रवृत्ती अनेक लहान मुलांच्यामध्यें आपणांस पाहावयास सापडतील. संगीताच्या मधुर स्वरांनीं भारावून जाणाऱ्या लहान

मुलांवर केवळ स्वरमाधुरीचीच मोहिनी पडत असली पाहिजे. गाइलेल्या किंवा वाजविलेल्या गाण्याचा अर्थ कळण्याच्या स्थितींत तीं नसतात व त्यामुळें संगीतापासून जो थोडाफार आनंद त्यांना अनुभवायला मिळतो तो बराचसा शुद्ध व निरपेक्ष असा असतो, हें मान्य केलें पाहिजे. तसेंच सुंदर चित्रानें आकर्षिले जाणारें मूल त्या चित्राच्या व्यावहारिक अर्थाला खासच पारखें असतें. मग त्याच्यावर कशाची मोहिनी पडते? येथेंहि असेंच उत्तर द्यावें लागेल कीं त्या चित्रामध्यें रंगसंगति व रचनासौष्ठवादि अनेक कारणांमुळें उत्पन्न झालेल्या परिणामाची– माधुर्याची– त्या बालमनावर अजाणतांच छाप पडत असते.

पाहणाऱ्याच्या किंवा अनुभवणाऱ्याच्या दृष्टिकोनावर अवलंबून नसणारें व वस्तूच्या ठिकाणीं असणाऱ्या कोणत्यातरी गुणविशेषामुळेंच केवळ उत्पन्न होणारें आकर्षण हें सौंदर्यविचाराला अत्यंत महत्त्वाचें आहे.

सौंदर्य म्हणजे काय याबद्दल अनादिकालापासून वेगवेगळ्या व्यक्तींनीं– कवि, चित्रकार, शिल्पकार इत्यादि कलावतांनीं– व त्याचप्रमाणें विश्वाचें कोडें सोडविण्याचा प्रयत्न करणाऱ्या तत्त्वज्ञान्यानीं, आपापले विचार जगापुढें माडलेले आहेत. पण त्यापैकीं बहुतेकानीं माडलेले विचार हे काहीं काळपर्यंतच मान्य होऊं शकले व तेहि विशिष्ट समाजामध्येंच. सौंदर्याबद्दलची सर्वसमत अशी व्याख्या अद्यापि कोणीं दिलेली नाहीं

जें मनाला आनंद देतें तें सौंदर्य अशी व्यापक व्याख्या देण्याचा अनेकांनीं प्रयत्न केला आहे. पण 'मन' आणि 'आनंद' या शब्दाचा निश्चित अर्थ ठरल्याशिवाय ह्या व्याख्येला देखील

निश्चितपणा येणें शक्य नाहीं.

'मन' म्हणजे काय आणि त्याला शरीरापेक्षां वेगळें अस्तित्व आहे कीं नाहीं ह्या प्रश्नाचें उत्तर मानसशास्त्रज्ञांना देखील पूर्णपणें देता आलेले नाहीं. मानसशास्त्राच्या साह्यानें तत्त्वज्ञान्यांनीं तोच प्रयत्न केला तरी देखील त्याचा निर्णय अद्यापि लागलेला नाहीं. 'मन' आणि 'आत्मा' यांमधील भेद स्पष्ट करण्याचा प्रयत्न अजून पूर्णावस्थेला जावयाचा आहे.

'आनंद' ह्या शब्दाची व्याप्ति काय याचाहि मनाप्रमाणेंच अद्यापि निर्णय व्हावयाचा आहे. शरीराला वाटणारें सौख्य म्हणजे आनंद कीं केवळ वैचारिक प्रातात अनुभवाला येणारी सुखकर भावना म्हणजे आनंद हा देखील वादाचा प्रश्न आहे.

पण अशा अनिश्चितपणामुळें जगाचे व्यवहार कांहीं थाबलेले नाहीत. ह्या दोन्ही शब्दांचे व्यवहारातले अर्थ थोड्याफार निश्चितपणें आपल्याला माहीत असतात व तेवढ्यावरून आपण आपले त्याविषयीचे विचार बोलून दाखवीत असतों.

'सौंदर्या'ची व्याख्या करता आली नाहीं तरी मानवांतील उच्चतम भावना चेतविण्याचें काम सौंदर्य पुरातन कालापासून करीत आलें आहे ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. सौंदर्य सर्व ठिकाणीं अस्तित्वात असतें आणि जों जो आपण त्याचा शोध करूं लागावें तों तों त्याचें स्वरूप आपल्याला अधिकाधिक प्रमाणात स्पष्ट होऊं लागतें.

कोणत्याहि बाह्य वस्तूचें किंवा गोष्टीचें ज्ञान प्रथमतः आपल्याला ज्ञानेंद्रियांच्या द्वारा होत असतें. असें ज्ञान प्राप्त करून देण्यांत एक किंवा एकापेक्षां अधिक ज्ञानेंद्रियें काम करीत अस-

तात. बालपणापासून मिळत आलेल्या अनुभवाच्या साह्यानें मिळालेल्या ज्ञानलहरींचा (sensations) अर्थ आपण लावीत असतों. प्रारंभीं एकाद्या वस्तूचे गुण समजण्यासाठीं जसा एकाच वेळी वेगवेगळ्या ज्ञानेंद्रियाचा उपयोग करावा लागत होता तशी अवश्यकता पुढें न राहतां एका ज्ञानेंद्रियानें आणलेल्या संदेशांवरून इतर ज्ञानेंद्रियें उपयोगांत न आणता देखील आपल्याला त्या वस्तूचें पूर्ण ज्ञान होऊं लागतें. अशा रीतीने बाह्य जगांतील वस्तूचे ज्ञानेंद्रियांनीं आणलेले संदेश (जाणीव) व आपल्या अनुभवानें व बुद्धीच्या साह्यानें आपण त्या संदेशाचा लावलेला अर्थ (interpretation) ह्या गोष्टी त्या वस्तूंच्या आपल्याला होणाऱ्या ज्ञानात समाविष्ट असतात.

ज्ञानेंद्रियाच्या द्वारा येणाऱ्या सर्व संदेशाचें महत्त्व सारखेंच नसते, व त्याच्या महत्त्वानुसार आपल्याकडून प्रतिक्रिया (reaction) केली जाते. समोरून भरधाव येणारी गाडी पाहून आपण चटकन् बाजूला सरतों पण एकादा मित्र येत असलेला पाहून त्याच्याशीं दोन शब्द बोलण्यासाठीं आपण उभे राहतों. तसेंच ज्ञानेंद्रियांनीं आणलेल्या संदेशांपैकीं बरेच संदेश आपण लक्षात घेण्याचेंहि नाकारीत असतो. रस्त्यांतून जातायेताना अनेक वस्तु किंवा व्यक्ती आपणाला दिसतात पण त्यापैकी बहुतेकाची आपल्याला जाणीव देखील होत नाहीं.

आपल्याकडून होणाऱ्या प्रतिक्रियेचें स्वरूप निश्चित करण्यात अनेक गोष्टींचा भाग असतो. त्या गोष्टींपैकी एक म्हणजे त्या संदेशाचा प्रकार किंवा महत्त्व. मानसशास्त्रदृष्ट्या अवधान (attention) हें अनेक गोष्टींवर अवलंबून असतें. समान संदेशांचा किंवा वस्तूंचा पूर्वानुभव हा फार महत्त्वाचा घटक आहे, व अशा वेळीं

आपली प्रतिक्रिया विशेष स्वरूपाची असते. नावीन्य, वैचित्र्य, आकस्मिकता किंवा अनपेक्षितपणा ह्यांना देखील बरेंच महत्त्व आहे. कारण, यांपैकीं कोणताहि गुण उपस्थित असेल तर लागलेंच आपलें लक्ष वेधलें जातें. त्याचप्रमाणें आपल्या बुद्धीची तीव्रता, आपली आवड-निवड व आपले हितसंबंध अशा प्रकारच्या अनेक गोष्टी आपल्या मनाची प्रवृत्ति व आपला दृष्टिकोन ठरविण्याच्या कामी सहभागी असतात.

आपली प्रतिक्रिया नेहमीच सारख्या तीव्रतेची नसते. काहीं वेळा ती अगदी वरवरची व तात्कालिक स्वरूपाची असते. अशा वेळीं त्या संदेशांचा आपल्यावर होणारा परिणाम गाढ स्वरूपाचा किंवा सखोल नसतो व तो क्षण गेल्यानंतर पुन: त्याबद्दल आपल्या मनात क्वचितच विचार येतात. अशी प्रतिक्रिया बहुतेक वेळा केवळ शारीरिक स्वरूपाची व विकारप्रधान असते. गौण अशा स्वार्थी प्रवृत्तींखेरीज इतर प्रवृत्तींना त्यात बहुतकरून स्थान नसतेंच असें म्हटलें तरी चालेल.

पण एकादें दृश्य किंवा कांहीं विशिष्ट संवेदना आपल्या गाढ भावना मुळापासून हलविण्याला किंवा ज्याचा विकारी वृत्तीशीं फारसा संबंध नाहीं अशी एका प्रकारची गाढ अस्वस्थता आपल्या मनात उत्पन्न करायला समर्थ ठरेल. असा अनुभव येईल तो प्रसग आपल्या स्मृतीवर अत्यंत महत्त्वाचा म्हणून अधिष्ठित होत असतो. कलावंताचा कलात्मक आत्मप्रत्यय अशाच वेळीं जन्माला येत असतो. वेगळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे बाह्य जगाच्या दर्शनानें किंवा निरीक्षणानें आपल्यातील गूढ भावना फुलविल्या जाऊन त्या दोहोंच्या संगमामुळें आपल्या मन:स्थितीमध्यें काहीं एका विशिष्ट

प्रकारचें चैतन्य उत्पन्न होतें. अशा चैतन्यानुभूतीचा आविष्कार मात्र सर्वांनाच करता येतो असें नाहीं. ज्याना तो करतां येतो ते कलावंत. आपल्याला आलेला चैतन्यानुभव किंवा कलात्मक आत्मप्रत्यय वेगवेगळ्या माध्यमाच्या साह्यानें आपल्या कलाकृतींच्या द्वारा ते जगापुढें ठेवीत असतात.

पण ह्या कलाकृतींचें किंवा भावात्मक चैतन्यानुभवाचें उगमस्थान आपल्या मनात सापडणारें नसून ज्या वस्तूच्या दर्शनानें अथवा सवेदनामुळें आपल्या मनांत ते चैतन्य उत्पन्न झालें त्या वस्तूच्या ठिकाणीं असणाऱ्या गुणविशेषामध्येंच असतें. कारण, त्या गुणांच्या अभावी आपल्या भावना काहीं चेतविल्या जाणें शक्य नाहीं. छायालेखनामध्यें (photography) एका बाजूस चित्रविषय (object) व दुसऱ्या बाजूस कॅमेऱ्याच्या कांचेतून (lens) येणारें त्या चित्रविषयाचें प्रतिबिंब उतरून घेण्याकरिता विशिष्ट रसायनाचा (emulsion) लेप दिलेली कांच (negative) असते. बाह्यजगातील वस्तु आणि आपलें संवेदनक्षम मन यांचा देखील अशाच प्रकारचा संबंध असतो. कांचेवरील रसायन ज्या प्रमाणांत संवेदनक्षम (sensitive) असेल त्या प्रमाणांत चित्रविषयाचा ठसा चागला उमटेल, त्याचप्रमाणें मनाच्या सवेदनक्षमतेची तीव्रता जेवढी जास्त तेवढी आपली भावात्मक चैतन्यानुभूति देखील मोठी. प्रतिबिंबधारक कांचेवर नंतर करण्यांत येणारी रसायनक्रिया व आपल्या चैतन्यानुभूतीला दिलेल बौद्धिक आणि कल्पनाशक्तीचें साह्य किंवा संस्कार सारखेच. कांचेवरील रसायनक्रिया पूर्ण झाल्यानंतर ज्याप्रमाणें रसायनयुक्त कागदावर त्याचा यथावस्तु ठसा उमटविण्यांत येतो त्याचप्रमाणें माध्यमाचा (साध-

नाचा) उपयोग करून आपला भावात्मक आत्मप्रत्यय कलाकृतीच्या द्वारा कलावंत प्रतीत करीत असतो.

छायालेखनाच्या ह्या उपमेवरून वस्तूच्या ठिकाणीं असणारे गुणविशेष, आपल्याला त्यांची होणारी जाणीव, त्या जाणिवेपासून उत्क्रान्त होणारा भावात्मक आत्मप्रत्यय व अखेरची स्थिति म्हणजे माध्यमांच्या साह्यानें जन्माला येणारी कलाकृति याचे परस्परसंबंध लक्षांत येण्यासारखे आहेत. बाकीच्या सर्व गोष्टी तात्पुरत्या गौण मानून आपल्या गूढ भावनांना आन्दोलनें देणारे वस्तूमधील गुणविशेष म्हणजेच त्या वस्तूचें सौंदर्य असें सामान्यतः म्हणता येईल. अशा प्रकारची सौंदर्याविषयींची कल्पना ही व्यक्तिनिष्ठ (subjective) नसून वस्तुनिष्ठ (objective) आहे आणि असली पाहिजे. त्याखेरीज तिच्याबद्दल कोणत्याहि प्रकारें चर्चा अथवा सिद्धान्त करता येणार नाहींत.

पण ह्याच वेळीं एक गोष्ट दृष्टीआड होऊं देतां कामा नये; आणि ती म्हणजे ज्या व्यक्तीला भावात्मक आत्मप्रत्यय येतो त्या व्यक्तीच्या संवेदनक्षमतेवर आणि इतर मानसिक गुणांवर त्या आत्मप्रत्ययाचा प्रकार बराचसा अवलंबून असणार. या दृष्टीने पाहता सौंदर्याचें स्वरूप अंशतः व्यक्तिनिष्ठ (subjective, personal) असतें. एकाच वस्तूचें चित्र वेगवेगळे चित्रकार निरनिराळ्या प्रकारें रंगवून तीमधील सौंदर्याचा विविध रीतींनीं आविष्कार करून दाखवितील. तथापि सौंदर्याचा शास्त्रीय दृष्टया विचार करतांना हें व्यक्तिनिष्ठ स्वरूप गौणच मानलें पाहिजे.

एकादें सुंदर चित्र अनेक प्रेक्षकांना आनंदित करील. हा आनंद उत्पन्न करण्यात विविध प्रकारचीं कारणें असूं शकतील. कुणी

चित्रविषयानें आकर्षिला जाईल किंवा विकारांना चेतना देणाऱ्या त्यातील एकाद्या उपांगानें कुणी मोहित केला जाईल. कुणाला त्या चित्रावरून एकाद्या पूर्वानुभूत प्रसंगाची स्मृति होईल व त्या कारणानें त्याला त्या चित्राबद्दल जिव्हाळा वाटूं लागेल. अशीं व्यक्तिनिष्ठ कारणें अनेक असूं शकतील. पण ह्या सर्व गोष्टी सोडल्या तर चित्रकारानें आपली सौंदर्यप्रतीति विशिष्ट प्रकारच्या रचनासौष्ठवाच्या आधारें, छटांच्या किंवा रंगाच्या नयनमनोहर माडणीनें करण्याचा जो प्रयत्न केलेला असेल तो मात्र सर्वांनाच आकर्षून घेईल. अगदीं लहान मुलापासून तो वृद्धापर्यंत सर्वांवर मोहिनी पडेल ती ह्याच गुणाची. अशा प्रकारच्या सौंदर्यानुभवाची तीव्रता सर्वांच्या ठिकाणीं अर्थातच सारखी नसणार, ती गोष्ट प्रत्येकाच्या मनाच्या संवेदनक्षमतेवर अवलंबून राहील; तथापि हा फरक प्रमाणाचा (degree) असून प्रकाराचा (quality) नसणार.

बऱ्याच गीताची लोकप्रियता बव्हंशीं दोन गोष्टींवर अवलंबून असते. त्यांतील काव्य व्यक्त करणाऱ्या शब्दयोजनेचा लौकिक अर्थ आणि विशेष प्रसंगीं गाइल्याकारणानें किंवा त्यामागील परिस्थितिनिष्ठ पार्श्वभूमीमुळें त्या पद्याला येणारी अन्वर्थकता ही एक गोष्ट. दुसरी म्हणजे, याच्या जोडीला स्वरांचें वैचित्र्य आणि चढउतार हीं त्यातील नादमाधुर्य निर्माण करून त्या पद्याच्या आकर्षकतेंत (fascination) भर टाकीत असतातच. पण संगीताचें हें स्वरूप वरवरचें(superficial) असते.कोणत्याहि रागामध्यें स्वरांच्या विशिष्ट रचनेमुळें व संगतीमुळें आणि त्याला पोषक अशा तालामुळें येणारें माधुर्य हेंच संगीताचें खरें सौंदर्य. ह्याचे आकलन होण्याची शक्ति सर्वांसच नसते व म्हणून सामान्य लोकांचे लक्ष वर सांगि-

तलेल्या गौण उपांगाकडे वेधलें जातें. संगीत-समाधीमध्यें स्वरांची नवनवीन रचना करून त्या रचनेपासून उत्पन्न होणारें माधुर्य अनुभवीत नव्या रागाची निर्मिती करणाऱ्या संगीताचार्याला अशा वेळीं जो आत्मप्रत्यय येत असतो तो मात्र निश्चितपणें शुद्ध आणि उच्च प्रतीचा असतो.

'मनाला आनंद देते ते सौंदर्य' ह्या कल्पनेमध्यें 'आनंद' ह्या शब्दाचा अर्थ 'आपल्याला हसविणारी भावना' असा घ्यावयाचा नाहीं. वास्तविक पाहतां हास्य हा एका विशिष्ट मन:स्थितीच्या अनेक प्रकारच्या आविष्कारांपैकीं एक प्रकार आहे. तो सर्वसामान्य-हि नाहीं. कारण एखाद्या दृश्यामुळे कुणाला अनावर असें हसे येईल तर कुणाच्या चेहऱ्यावर किंवा नेत्रामध्यें सहज लक्षात येणारा तेजोमय फरक होईल. अर्थात् आविष्काराच्या प्रकाराची व त्या-मागील भावनेची गल्लत करता कामा नये. एकादी शोकपर्यवसायी कादंबरी वाचताना आपल्या भावना उफाळून येतात आणि आपल्या डोळयात अश्रु उभे राहतात. तथापि त्याच वेळीं त्या कादंबरीपासून आपल्याला एक प्रकारचें गाढ समाधान वाटतें व तो ललितवाङ्मयीन सौंदर्यानुभव आहे असे आपण मानतों. एकादा हृदयस्पर्शी चित्रपट पाहतांना आपल्याला येणारा अनुभव देखील अशाच प्रकारचा असतो. तेव्हा 'आनंद' ह्या शब्दाचा अर्थ आविष्कारापेक्षा भावनेच्या मूळ स्वरूपाशीं व तिच्या तीव्रतेशीं जास्त निगडित आहे हें ध्यानात ठेवलें पाहिजे.

स्त्रीसौंदर्याविषयीं विचार करतांना वरील गोष्टींचा आपल्याला बराच आधार घेतां येण्यासारखा आहे. ज्याप्रमाणें रचनाचातुर्य, समतोलपणा, प्रमाणबद्धता वगैरे गुणविशेष एकाद्या चित्रांतून

प्रतीत होणाऱ्या सौंदर्याच्या मुळाशीं असतात, किंवा स्वररचना, स्वरसंगति, ताल किंवा लय ह्या गोष्टी संगीतांतील माधुर्याचें स्वरूप ठरवीत असतात त्याचप्रमाणें स्त्रीदेहाच्या ठिकाणी देखील असेच कांहीं गुणविशेष सौंदर्यनिष्पत्ति करीत असले पाहिजेत.

तथापि हे गुणविशेष कोणते आहेत हें पाहण्याआधी त्याविषयींच्या पुरातन व प्रचलित कल्पनाचें थोडेंफार विवेचन करणे अवश्य आहे. सौंदर्यानुभव ही गोष्ट कितीहि प्राथमिक स्वरूपात कां असेना पण अत्यंत पुरातन अशीच आहे, आणि तिचा आविष्कार चित्रकला, शिल्पकला, मूर्ती इत्यादींच्या द्वारा इतिहासपूर्वकालातहि झालेला, उत्खननात उपलब्ध झालेल्या कलाकृतींच्या अवशेषावरून, पाहायला सापडतो. मात्र अशा कलावताच्या मनावर सौंदर्याबरोबरच नैतिक, धार्मिक, राजकीय इत्यादि अनेक दृष्टिकोनांचा झालेला परिणामहि त्याच्या कलाकृतीतून प्रतीत झालेला आहे. आपल्याकडील कोरीव लेण्यातील शिल्पकला आणि भिंतीवर रंगविलेलीं चित्रें (fresco-paintings) हीं प्रायः धार्मिक वृत्तीच्या वर्चस्वाखालीं निर्माण झालीं. मध्ययुगीन युरोपात जी धार्मिक विचाराची प्रचंड लाट उसळली त्या वेळीं प्रत्येक चित्रकारानें व्हर्जिन मेरी (Madonna) चे चित्र काढलें व त्या चित्रात अत्यंत विशुद्ध व सात्त्विक अशा स्त्रीसौंदर्याचा आविष्कार करण्याचाच यत्न करण्यात आला. वेगवेगळ्या देशांत व निरनिराळ्या कालांत त्या त्या देशाच्या व कालाच्या धार्मिक प्रवृत्तींचा आविष्कार करणाऱ्या कलाकृती निर्माण झाल्या. धार्मिक प्रवृत्तींप्रमाणें इतर वैचारिक प्रवृत्ती देखील देशकालानुसार कलाकृतींचे स्वरूप ठरविण्यांत महत्त्वाचा भाग घेत होत्या असेंच दिसून येईल. पण

ह्या सर्व प्रवृत्ती जशा चिरंतनत्व पावू शकल्या नाहींत त्याचप्रमाणें त्यांचा आविष्कार करणाऱ्या कलाकृती देखील सार्वकालीन महत्त्व पावूं शकल्या नाहींत.

मनुष्यप्राण्याच्या अनेक जाती (races) आहेत व प्रत्येक जातीमध्यें सौंदर्याच्या विशिष्ट कल्पना रूढ असतात. नीग्रो लोकांतहि सौंदर्याच्या कल्पना आहेतच. प्रत्येक जातीमध्यें कांही शारीरिक वैशिष्ट्यें असतात आणि तीं जास्तीत जास्त प्रमाणात ज्या व्यक्तीमध्यें आढळतील ती व्यक्ती त्या जातीपुरती सुंदर म्हणून समजण्यात येत असते. एका जातींत जर स्थूलपणा हे सौंदर्याचें लक्षण मानलें जात असलें तर दुसरीमध्ये अत्यंत कृश व्यक्तीला सुंदर समण्यांत येत असेल. अनेक पिढ्याच्या किंवा शतकाच्या संस्कारामुळें सामान्य माणसाची दृष्टी अशी बनलेली असते कीं त्याच्या जातींत सुंदर म्हणून समजली जाणारी व्यक्तीच त्याला सुंदर वाटते.

जातीमध्यें वस्त्राभरणाची किंवा अलंकाराची जी पद्धति (fashion) प्रचलित असते तिच्याकडे पाहण्याची दृष्टी देखील सौंदर्यकल्पनामध्यें महत्त्वाचें स्थान मिळवून बसत असते. त्यामुळें सामान्य लोकांची दृष्टी पुष्कळ वेळा खऱ्या सौंदर्याला पारखी झालेली असते. महाराष्ट्रातील पांढरपेशा आणि सुखवस्तु समाजाचें उदाहरण घेतलें तर काहीं वर्षांपूर्वी नाकांत नथ घातल्याखेरीज अलंकाराचें लेणें पूर्ण होत नसे; आणि आतां मौल्यवान अलंकाराची महती– कोणत्याहि कारणानें का असेना– फार कमी झाली असून त्यांचें महत्त्व विशिष्ट प्रकारच्या कपड्यांनीं आणि पाठीवरच्या शेपट्यानें मिळविलें आहे. विचार आणि परिस्थिती या दोन गोष्टींचा परिणाम कोणत्याहि काळच्या वेशभूषेच्या पद्धतीवर

होत असतो. जीवनाचीं मूल्यें बदलत जातात तसतसा बरावाईट परिणाम समाजाच्या राहणीवर होणें अपरिहार्य असतें. पण त्याच वेळीं एक गोष्ट दृष्टीआड हाऊं देता कामा नये, आणि ती म्हणजे समाजातील अधानुकरणाची प्रवृत्ती. जें होत असतें तें चागलेंच असलें पाहिजे ही भावना निर्दोष नाही. अपरिचित मार्गावरील दुवाटा हा पुष्कळ वेळा आपल्या यशापयशाची निश्चिती करीत असतो. चुकीचा मार्ग बराच आक्रमिल्यानंतर देखील पुष्काळदा आपल्याला माघारें फिरण्याची अप्रिय वेळ येते, आणि ती टाळण्याचा जितका प्रयत्न करावा तितकी आपली परिस्थिती अधिकाधिक भीतिप्रद होत असते. त्याचप्रमाणें समाजातील कुणी तरी एकादी व्यक्ति किंवा संप्रदाय विशिष्ट उद्देशानें एकादी गोष्ट करतो आणि मग तो उद्देश दृष्टीआड करून सामान्य जनता त्या गोष्टीचें अमर्याद अनुकरण करूं लागते. मूळ गोष्ट ज्या कारणानें आणि ज्या परिस्थितींत योग्य किंवा समर्थनीय असते तें कारण किंवा परिस्थिती अनुकरणाच्या बाबतींतहि असते असे नाही. या बाबतींतलें एक ठळक उदाहरण म्हणजे चित्रपटतारकाच्या वेश-भूषेचें आपल्या समाजांतील सुशिक्षित-अशिक्षितानीं चालविलेलें अनुकरण. ज्या वर्गांतील स्त्रियाचें अनुकरण केलें जात आहे त्या वर्गात उघड उघड वेश्याव्यवसाय करणाऱ्या स्त्रियाचें प्रचंड संख्या-धिक्य असतें ही गोष्ट ध्यानात ठेविली पाहिजे. त्याच्यातील केवळ सौंदर्यासाठीं नवनवीन वेशभूषेचे प्रकार निर्माण करण्याची पात्रता अंगीं असलेल्या थोडयाच. त्यांची वेशभूषा निश्चित करण्यात मुख्यत: दोन गोष्टींचें प्रभुत्व आपल्याला दिसून येईल. त्यापैकीं एक म्हणजे शेवटच्या वर्गाचें 'हाऊस फुल्ल' होण्यासाठीं, औचि-

त्याचा विचार देखील न करता नट्यावर दिग्दर्शकाकडून लादण्यात येणारी कामुक किंवा पुरुषप्रेक्षकाच्या हलक्या, विकारी भावनांना उत्तेजित करणारी वेशभूषा, आणि दुसरें म्हणजे सदासर्वकाळ ती वापरणाऱ्या नट्याची 'धंदेवाईक' गरज. अशा वळीं सभ्यतेकडे दुर्लक्ष होऊन फक्त लोकांची दृष्टी आकर्षून घेणारी वेशभूषा त्यांनीं केली तर त्यात नवल नाहीं. सौंदर्यदृष्टया काय केलें पाहिजे याबद्दल कलात्मक दृष्टीनें शास्त्रशुद्ध विचार करणारे 'कलादिग्दर्शक' आपल्याकडे फारच थोडे आहेत. पण हा एकंदर प्रकार तसल्या वेशभूषेचें अनुकरण करणाऱ्या विवाहित-अविवाहित, सुशिक्षित-अशिक्षित स्त्रियांकडून लक्षात घेतला जात नाहीं. मूळ आदर्शच भ्रष्ट, त्या ठिकाणीं अनुकरणात तरी सदभिरुचि कुठून येणार ? अर्थात् ही आपल्याकडील परिस्थिति आहे.

स्त्रीसौंदर्याविषयीच्या प्रचलित कल्पनामध्ये अनेक उपांगे आपल्याला आढळतील. त्यांपैकीं स्त्रीच्या अंगीं वसत असलेल्या मानसिक गुणाविषयी पुष्कळ वेळा महत्त्वानें उल्लेख केला जात असतो. वास्तविक स्वभावाची, विचाराची व वागण्याच्या पद्धतींतील सहृदया इत्यादि गुणविशेषांची मोहिनी इतरावर पडणें ही गोष्ट पुरुष व स्त्री ह्या दोघासहि समान आहे. सुंदर शरीरापेक्षां व्यवहारांत ह्याच गोष्टीना अधिक महत्त्व असतें. अगदीं सामान्य रूप असणारे पुरुष किंवा स्त्रिया आपल्या अंगच्या इतर गुणानी पुष्कळ वेळा अत्यंत सुंदराना देखील जें महत्त्व, जी लोकप्रियता मिळविता येत नाहीं ती मिळवूं शकतात. आणि म्हणूनच मानसिक गुणविशेषाना अतिशय महत्त्व देण्याकडे आपला स्वाभाविक कल असतो.

मानवी आयुष्याच्या शैशव, तारुण्य आणि वार्धक्य यांतील

मधली स्थिती ही आपला सर्वच दृष्टिकोन बदलून टाकीत असते. स्त्रियांच्या सौंदर्याबद्दल अत्यंत उत्तान, शृंगारिक व कामुक प्रदर्शनें पुष्कळ वेळा औचित्याचा भंग करून पुरुष कलावंताकडून निरनिराळ्या माध्यमाच्या द्वारा केली जात असतात त्याच्या मुळाशीं तारुण्य-सुलभ अशा विकारी भावना व अशा गोष्टींबद्दल सामान्य जनतेला वाटणाऱ्या आकर्षणाची तीव्र जाणीव ह्या दोन गोष्टीच प्रामुख्यानें असतात. बालवयात मनुष्य साधारणपणें कलाकृतींना जन्म देण्याच्या परिस्थितीत क्वचितच असतो. तारुण्यात जगाकडे पाहण्याच्या आपल्या दृष्टीवर लैंगिक प्रवृत्तींनीं बरेंच स्वामित्व मिळविलेलें असतें. पुरुष कलावंताची दृष्टी प्रारंभी तरी प्रायः कामुक असण्याचें हेंच कारण. कलेच्या मूलतत्त्वाचा परिचय झाल्यानंतर सौंदर्याबद्दलच्या विकारयुक्त भावनाचा जोर कमी होतो. पण कुणीहि ह्या स्थितीला तारुण्याच्या उन्मादावस्थेत पोंचणें कठीण आहे.

तारुण्यात प्राधान्य मिळालेला हा दृष्टिकोन पुरुषाच्या बाबतींत त्याच्या प्रौढपणी किंवा वार्धक्याच्या स्थितींत देखील संपूर्णपणें बदलत नाही. पुष्कळ वेळा त्याची तीव्रता पूर्वीइतकीच, किंबहुना वाढलेली, आढळते. याचें कारण प्रायः पुरुषाच्या ठिकाणीं फार उशीरापर्यंत टिकून राहणारी प्रजोत्पादनक्षमता व तिला पोषक अशी मनोवृत्ति. तारुण्यात अगवळणीं पडलेला स्त्रीकडे पाहण्याचा विशिष्ट प्रकारचा दृष्टिकोन इतक्या दीर्घकालानंतर बदलणें सोपे नसतें. कोणतीही संवय (habit) ही वार्धक्यात बदलणे एकंदरींत कठीणच—आणि म्हणूनच शरिरातील कामुकतेची तीव्रता कमी झाली तरी प्रवृत्ती मात्र एकदम नाहीशा होत नाहींत.

तारुण्यांत जसें पुरुषांना स्त्रीदेहाबद्दल कुतूहल आणि आकर्षण

वाटतें तसेंच पुरुषाबद्दल स्त्रीला देखील वाटलें पाहिजे व वाटतहि असतें. पण तिच्या नैसर्गिक प्रवृत्ती मात्र अत्यंत 'लाजाळू' (shy) आणि आपल्या विकारांचें आणि भावनांचें–कलेच्या द्वारा सुद्धां–प्रदर्शन मांडायला तितक्याशा अनुकूल नसतात. Art lies in concealing art हें तत्त्व पुरुषापेक्षां स्त्रियांनाच अधिक लागू पडतें. आपल्या भावना शब्दांनी बोलून दाखवायला ती साधारण-पणें तयार नसते, आणि यामुळे ती सूचकतेचाच प्रायः आश्रय करीत असते. पुरुष कलावंत स्त्रीविषयक गोष्टी जितक्या मोकळे-पणानें आपल्या कलाकृतींतून प्रकट करीत असतो तितक्या प्रमा-णात पुरुषाविषयींच्या भावना स्त्री कलावंताकडून प्रकट केल्या जाणें संभवनीय नाहीं. स्त्रीच्या ठिकाणी असणारा स्वयंप्रेरित-पणाचा अभाव हेंच याचें खरें कारण. तारुण्यावस्था ही स्त्रीच्या आयुष्यांतून लौकर निघून जात असते, ही गोष्ट देखील लक्षांत ठेवणें महत्त्वाचें आहे.

अवयवाचा रेखीवपणा नसताना व मानसिक गुणाचा बराच अभाव असताना देखील काहीं स्त्रिया पुरुषाचें लक्ष तेव्हाच आक-र्षून घेतात. ह्याचें कारण त्याच्या ठिकाणीं असणारें लैंगिक आक-र्षण. ह्याचें स्थान वेगवेगळ्या अवयवाच्या ठिकाणीं असू शकेल–किंवा नुसत्या दृष्टींतहि त्याची शक्ती प्रतीत होईल. विशिष्ट प्रकार-च्या अंगविक्षेपानीं, पुरुषाकडे पाहण्याच्या विशिष्ट नजरेतून किंवा फाजील लाघवी बोलण्याचालण्यानें अशा प्रकारच्या आकर्षणात भर पडत असते. तथापि अशा प्रकारचें आकर्षण स्त्रीच्या ठिकाणीं विशिष्ट वयोमर्यादेंतच असतें असें नाहीं. यौवनप्राप्तीच्या आधीं, किंवा पोक्तपणांत–तारुण्याचा काल संपल्यानंतर देखील–तें कांहीं

स्त्रियांच्या ठिकाणीं आढळतें.

स्त्रीदेहाचे काहीं अवयव निसर्गतःच कामोत्तेजक किंवा ज्याच्या दर्शनानें किंवा संघर्षणानें पुरुषाच्या वैषयिक वृत्ती चेतविल्या जातात असे असतात. त्यांना उद्दीपक अवयव (erogenous zones) असें म्हणतां येईल. ओठांची विशिष्ट प्रकारची रचना, स्तन, काख, नितंब इत्यादि अवयवाचें महत्त्व ह्या दृष्टीनें फार आहे. अशा अवयवांचें प्रदर्शन करणें किंवा वस्त्राभरणाच्या विशिष्ट पद्धतीनें त्या अवयवांना प्राधान्य किंवा प्रकटपणा आणणें, अंग-विक्षेपानीं त्याकडे इतरांचें लक्ष वेधणें ह्या गोष्टी, पुरुषाला मोहून घेणाऱ्या स्त्रियाचीं हुकमी आयुधें होत. स्त्रीसौंदर्याच्या आपल्या रसग्रहणामध्यें लैंगिक व अलैंगिक घटक परस्परामध्यें इतके गुंत-लेले असतात कीं त्याचें पृथक्करण करणें मोठेंच कठिण काम आहे. सौंदर्यग्रहणाचा आपल्या भावनाशीं निकट संबंध असल्या-मुळें सौंदर्यकल्पनाचें बौद्धिक दृष्ट्या पृथक्करण करणें अशक्यप्राय होऊन बसतें ही त्यात आणखी एक अडचण असते. तथापि विकार आणि भावना यांमधील भेद नीटपणें लक्षात आला तर मात्र ही अडचण तितकीशी मोठी वाटणार नाही. ज्या स्त्रियाचे वर उल्लेख केलेले उद्दीपक अवयव निसर्गतः विशेष प्रकट अस-तात किंवा कृत्रिम उपायांनीं त्याना प्राधान्य आणलेलें असतें त्या स्त्रिया सुंदर आहेत अशी कल्पना होणे अगदी साहजिक आहे. पण थोड्याशा विचारानंतर असलें आकर्षण 'सौंदर्याचे आकर्षण' खास नव्हे हे कळून येईल. कारण त्याचा प्रत्यक्ष परिणाम भावना-पेक्षां विकाराना जागृत करण्याचाच असतो.

बाह्य वस्तूंच्या संवेदना आपल्याला पांच ज्ञानेंद्रियांच्या द्वारा होत

असतात. रूप, रस, गंध, ध्वनि व स्पर्श अशा पंचविध संवेदनांनीं आपल्याला ज्ञान होत असतें. ह्या पाचहि प्रकारच्या संवेदनांमध्यें आकर्षक किंवा परावृत्त करणारे असे दोन्ही प्रकारचे गुणधर्म असूं शकतात. संवेदना आकर्षक, आल्हाददायक अथवा सुखकारक असल्या तर ती वस्तु आपल्याला आवडते किंवा सुदर वाटूं लागते. उलटपक्षीं संवेदना परावृत्त करणाऱ्या असल्या तर आपल्याला त्या वस्तूविषयीं तिटकारा वाटूं लागतो.

डोळयाना काहीं गोष्टी आवडतात त्याचप्रमाणे कांहीं गोष्टी पाहवत नाहींत. कुरूप किंवा भयानक व्यक्तीकडे पाहणें कुणालाच आवडत नाही. अर्थात् अशा गोष्टींमध्यें वैयक्तिक आवडीनिवडींचें महत्त्व असलें तरी काहीं दृश्यें अशीच असतात की तीं सामान्यत: सर्वांनाच आवडत नाहींत. या दृष्टीने विचार करता मनुष्यदेहाच्या ज्या अवयवामधून कोणत्याही प्रकारचा स्राव (secretion) होत असतो किंवा ज्या अवयवाचा, शरीराच्या त्वचेपेक्षा भिन्न स्वरूपाचा, आणि थोडाफार नाजुक असा भाग (mucous membrane) अवास्तव रीतीने बाहेर दिसतो अशी अवयवाची ठेवण ही कुणालाही परावृत्त करणारी अशीच वाटते. सौदर्याच्या दृष्टीनें वेगवेगळ्या जातींचा तौलनिक अभ्यास करताना ही गोष्ट प्रामुख्याने विचारात घ्यावी लागते. या कारणामुळेंच नाकाची छिद्रें सहज दिसतील अशी नाकाची ठेवण, किंवा बाहेर परतलेले जाड ओठ सौदर्याला हानिकारक ठरतात. लटक्या हास्यानें दतपंक्तीचें प्रदर्शन करणें हें कांही देशांमध्ये शिष्टसंमत असलें तरी तें सर्वांनाच आवडेल असें नाहीं. उलट, ओठ विलग होऊं न देता मुखावर जें मदस्मित दिसतें तें मात्र कुणालहि मोहक वाटते. त्वचेवर

पडलेले चट्टे किंवा डाग, तसेंच शरीरावर आलेली टेगळें हीं पाहणा-ऱ्याला ओंगळ वाटतात. अशा प्रकारच्या अनेक गोष्टी सौदर्य-विघातक ठरतात.

श. वा. (body odour)– शरीराला येणारा घामट किंवा अन्य प्रकारचा अप्रिय वास–म्हणजेच दुर्गंधि–, कुणालाच आवडणार नाहीं. प्रकृतीमधील तात्कालिक स्वरूपाचा बिघाड– अपचनादि– किंवा कायम स्वरूपाचा प्रकृतिदोष, अस्वच्छपणा वगैरे गोष्टीमुळेहि व्यक्ती अप्रिय होते.

कोमल आणि नादमधुर आवाज स्त्रीच्या आकर्षणांत भर टाकतो पण पुरुषी किंवा घोगरा आवाज स्त्रीच्या कठांतून ऐकताना आपल्याला कसेंसेच वाटतें. स्पर्शाबाबत सुद्धा असेंच म्हणता येईल कीं नाजुकपणाचा अभाव, किंवा पुरुषी राकटपणा स्त्रीविषयींच्या आपल्या कल्पनाशी अत्यंत विरोधी आहे. वर उल्लेख केलेल्या गोष्टी साहजिकच आपल्या मनावर आणि मतावर मोठाच परिणाम करीत असतात.

पुरुषाला स्त्रीबद्दल वाटणाऱ्या आकर्षणामध्यें, यापूर्वीं सांगितल्या-प्रमाणे, अनेक वेगवेगळीं उपागे असतात. शिथिल अर्थानें सौदर्य हा शब्द वापरला असतां, ज्याचा आपल्याला लाभ व्हावा (possession) किंवा ज्याचा उपभोग घ्यावा अशी आपल्या मनामध्यें इच्छा उत्पन्न होते तें सौदर्य, अशी एक शारीरिक (physical) कसोटी लावण्यात येते. अगदी अप्रच्छन्नपणें सागावयाचें म्हणजे ज्याचें चुबन घ्यावेंसें वाटेल तो सुदर चेहरा असें अगदीं सोपे गमक सुचविण्यात येतें. चागल्या गोष्टींचा लाभ व्हावा असें जें आपल्या-ला वाटत असतें तीच प्रवृत्ती अशा दृष्टिकोनाच्या किंवा गमकाच्या

मार्गे असते हे सहज लक्षात येईल. असली इच्छा होणें हे जरी साहजिक असलें तरी तो सौदर्याचा आवश्यक गुणधर्म (essential or indispensable quality) आहे असें मात्र मानतां येणार नाहीं. कार्यकारणाचा विचार करताही अल्पशा भागावरून सबंधाविषयी अनुमान करण्याचा तर्कदोषहि यात घडतोच. सगत किंवा सहवास घडावा असें वाटणें ही मानसिक गुणांची कसोटी म्हणून सागण्यांत येते; प्रवृत्तीच्या दृष्टीनें ही गोष्ट देखील वरच्यासारखीच आहे.

व्यक्तीचा स्वभाव त्याच्या चेहऱ्यावर प्रतीत होत असतो अशी आपली सामान्य भावना असते. बऱ्याच अशीं हें खरेंहि आहे. कुत्सित वृत्तीच्या माणसाचा चेहरा सुतकीच असावयाचा किंवा घमेंडखोर माणसाचा दर्प त्याच्या तोडावर स्पष्ट दिसावयाचा ही गोष्ट बऱ्याच वेळा अनुभवाला येते. प्रथमदर्शनीच कोणत्याहि व्यक्तीबद्दल आपलें जे बरें किंवा वाईट मत होतें तें अनुभवावर मुळीच आधारलेलें नसतांहि बव्हंशीं बरोबर असतें असा अनुभव येतो. ज्या व्यक्तीबद्दल आपलें चांगले मत होतें ती व्यक्ती दिसायला सुदर असतेच असे नाहीं. परंतु स्वभावातील आकर्षकपणापुढें शारीरिक वैगुण्य फारसें महत्त्वाचें वाटत नाही. तथापि सौदर्याच्या शास्त्रशुद्ध चिकित्सेमध्ये स्वभाव ही गोष्ट अत्यल्प महत्त्वाचीच असते. शिवाय अभिनयपटु माणसाचा स्वभाव त्याच्या चेहऱ्यावरून ओळखणें सोपें नसनें. कारण, 'One may smile and smile and be a villain!'

आतापर्यंत स्त्रीसौदर्याविषयींच्या, सामान्य लोकांच्यामध्यें रूढ असलेल्या, कल्पनाचें अल्पसें दिग्दर्शन केलें आहे. त्यापैकीं कांहीं

कल्पना सौंदर्याच्या शास्त्रशुद्ध विचाराच्या दृष्टीनें थोड्याफार महत्त्वाच्या ठरतील तर बऱ्याच कल्पना ह्या दृष्टीनें पूर्णपणें आकस्मिक व म्हणून निरुपयोगी ठरतील. आपलें विवेचन शक्य तितक्या निश्चित पायावर आधारलें तरच त्याला सर्वसामान्य चर्चेचें स्वरूप देता येईल व त्याची शुद्धाशुद्धता अजमावता येईल. हाच प्रयत्न आता आपल्याला करावयाचा आहे.

स्त्रीचें दृश्य स्वरूप किंवा त्याबद्दल नेत्रावाटे येणाऱ्या संवेदना ह्याचाच आपल्याला आधार घ्यावयाचा आहे, हें प्रथमतः स्पष्ट केलें म्हणजे आपल्या विचाराची दिशा निश्चित करता येईल. कारण व्यवहाराच्या दृष्टीनें विचार करता, दृष्टीच्या द्वारा येणाऱ्या संवेदना इतर ज्ञानेंद्रियाच्या द्वारा येणाऱ्या संवेदनापेक्षा अधिक महत्वाच्या असतात. लहानपणापासून दृष्टिगम्य संवेदनावरून वस्तूच्या इतर गुणांविषयीची अनुमानें अनुभवानें आणि अंदाजानें काढण्याची सवय आपण स्वतःला लावून घेत असतों आणि इतर कोणत्याहि ज्ञानेंद्रियापेक्षा डोळ्याचा उपयोगच आपण अधिक प्रमाणात करीत असतो.

स्त्रीसौंदर्याविषयीं बोलतांना स्त्रीच्या पार्थिव देहाबद्दलच सामान्यत. आपण चर्चा किंवा चिकित्सा करीत असतो आणि तो देह आपणाला कसा दिसतो हेंच मुख्यतः आपण ध्यानात घेतों. ध्वनि, स्पर्श, गंधादि विषयींचे विचार अशा वेळीं गौणच मानले जातात. अर्थात्, आपल्या चर्चेचा मुख्य विषय म्हणजे स्त्रीदेहाचें दृश्य सौंदर्य हाच होय.

या ठिकाणी एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे ती ही की सामान्यतः सौंदर्याची जाणीव सर्वांसच असली तरी त्यामध्येंहि प्रमाणा-

चा फरक खचित राहणार. ज्याची सौंदर्यदृष्टी अधिक घटलेली (developed) असेल त्याच्या मताला अधिक महत्त्व दिलें पाहिजे. या दृष्टीनें सामान्य प्रेक्षकापेक्षा प्रत्यक्ष सौंदर्यनिर्मिती करणाऱ्या कलावंताच्या दृष्टीला अधिक प्रांधान्य देणें क्रमप्राप्त आहे. कारण एक तर कलावंताला इतरापेक्षां सौंदर्याची जाणीव (æsthetic consciousness) अधिक असते व त्याशिवाय तें सौंदर्य कशामुळे निर्माण झालें ही गोष्ट देखील त्याला चिकित्सक बुद्धीनें ओळखावी लागते. म्हणजेच, त्याला सौंदर्याचें पृथक्करण करावें लागतें किंवा त्याचा कार्यकारणभावहि समजून घ्यावा लागतो. या कारणामुळें स्त्रीच्या दृश्य सौन्दर्याविषयीं चित्रकार व शिल्पकार याच्या मताला सामान्य माणसाच्या मतापेक्षा केव्हांहि अधिक महत्त्व दिले पाहिजे. 'सौंदर्याची कल्पना' हा शब्दप्रयोग वापरताना अर्थातच चित्रकार व शिल्पफार यांनीं मान्य केलेली कल्पना असें गृहित धरून चाललें पाहिजे. मात्र सर्वच चित्रकाराना किंवा शिल्पकाराना सौंदर्याचें मूलग्राही स्वरूप कळलेले असतें अशातला भाग मुळीच नाही : कोणत्याहि प्रातात अस्सलापेक्षा नकली मालाचाच भरणा अधिक असतो असेच अनुभवास येईल. यामुळें कलावंत म्हणविणाऱ्यापैकी खरे कोणते व बनावट कोणते हे पारखणे अत्यंत महत्त्वाचें आहे. आणि हें पारखण्यासाठीं त्या त्या कलाच्या मूलतत्त्वांची ओळख करून घेणें अगत्याचें आहे.

भक्तिमार्गानें (mysticism) अंतिम सत्याचें ज्ञान करून घेणाऱ्या व्यक्तींना तें ज्ञान कोणत्याहि बौद्धिक चिकित्सेच्या द्वारा होत नसतें. त्यांच्या भावना किंवा प्रबल अशी आध्यात्मिक शक्ती

व श्रद्धा यांच्या बळावरच त्याना ते होत असतें. आपल्याला ज्ञान कसें झालें हें त्याचें त्यानाच सागतां येणार नाही. कलावंताला होणारें सौंदर्यज्ञान हें देखील अशाच प्रकारें होत असतें : कोणत्याहि वस्तूमधील सौंदर्य त्याला प्रथमदर्शनींच पटतें आणि त्याला त्यापासून आनंद होतो. पण जेव्हा तो प्रत्यक्ष कलाकृती निर्माण करूं लागतो तेव्हा मात्र चिकित्सक बुद्धीचा थोडाफार उपयोग त्याला करावाच लागतो; आणि या ठिकाणींच शास्त्राची जोड कलेला मिळते. जें आपल्याला पटलें तें दुसऱ्याला समजावून देतानाच त्याविषयींचें शास्त्र निर्माण केलें जात असतें.

देहाचें सौंदर्य पारखताना आपल्याला अनावृत (nude) देहच लक्षात घेतला पाहिजे. पूर्वग्रह व अज्ञान यामुळें अनावृत व नग्न (naked) या दोहोमधील फरक आपल्या लक्षातच येत नाही. निसर्गानें निर्माण केलेल्या सौंदर्याची चिकित्सा करावयाची असेल तर तें निसर्गानें जसें निर्माण केलें व वाढविलें त्याच स्थितींत त्याबद्दल विचार झाला पाहिजे मानवी समाजरचनेनें आपल्या स्वास्थ्यासाठी व सुधारणेच्या दृष्टीनें प्रगतीसाठीं जे आचारधर्म निर्माण केले त्यांपासून मानवी आयुष्याला अनेक प्रकारचा कृत्रिमपणा आला. वेशभूषा, अलंकार वगैरे गोष्टी अर्थातच कृत्रिम, मानवनिर्मित अशा आहेत. त्या अयोग्य किंवा अनिष्ट आहेत असें म्हणण्याचा उद्देश मुळींच नाहींत. पण निसर्गनिर्मित गोष्टींच्या बद्दलची सौंदर्यचिकित्सा त्याच्या नैसर्गिक स्थितीवरच आधारली पाहिजे. तेव्हा 'अनावृत' म्हणजे निसर्गानें निर्मिलेल्या स्थितींत, कृत्रिमतेपासून अगदीं अलिप्त, असा अर्थ घ्यावयाचा. पण 'नग्न' ह्या शब्दाच्या अर्थामध्यें लज्जा, शालीनता, सभ्यता इत्यादि सामाजिक सद्गुणांच्या

दृष्टीनें अवश्य होऊन बसलेल्या वस्त्रांचा त्याग केलेला अशी कल्पना अंतर्भूत असते. अर्थात् नग्न ह्या शब्दाचा अर्थ थोडासा हलक्या प्रतीचा आणि म्हणून आक्षेपार्ह आहे. सौदर्यमीमांसेला 'नग्न'पणाशीं तत्त्वशः काहींएक कर्तव्य नाहीं. प्रसंगोपात्त एकाद्या स्त्रीला आलेली नग्नता चित्रामध्यें तपशीलाचा एक भाग म्हणून दाखवितां येईल पण केवळ नग्नतेच्या प्रदर्शनासाठीच चित्रनिर्मिती करणें मात्र सदभिरुचीचें लक्षण खासच नव्हे; कारण विकारी वृत्तींना चेतविणें एवढाच हेतु त्यात असतो.

"The Nude is the purest expression of Art, because it is truth, and it is truth because, deep down in the throbbing heart, the cry of the flesh and the worship of the beautiful—the slumbering aestheticism that is inherent in all of us and that we call love

In the Nude Art the Artist is striving to strike a corresponding chord of sympathy in the observer, to expose the soul of feeling He sees in the soft curves of the woman, appeal, and in the more hardened statue of man —response And in the combination of these two romance or tragedy—a medley of passions and emotions Parenthood, sorrow, hope, and a magnificient humanity with boundless possibilities of physical and spiritual perfection "

*A A Braun The Human Form in Art.*

वरील उताऱ्यांतील अर्थ कलात्मक दृष्टी नसलेल्या सामान्य वाचकाच्या लक्षांत पूर्णत्वानें येणें सोपें नाहीं. अनावृत देहाचें महत्त्व कलेमध्यें कोणत्या प्रकारचें असतें आणि त्यामागील नीतिकल्पना (The Ethics of Nude Art) काय याविषयीं विचार करतांना वरील उताऱ्यांचा फार उपयोग होण्यासारखा आहे.

कै. राजकवि तांबे यांचे विचारहि या दृष्टीनें महत्त्वाचे वाटल्या-वरून येथें देत आहें.

"अनावृत पार्थिव देह हा ईश्वरनिर्मित सौन्दर्याची प्रतिमा म्हणून व प्रमाणबद्धता, रचनासौष्ठवादि तत्त्वाच्या आविष्काराचें प्रतीक या दृष्टीनें कलावंताच्या आनंदाचें स्थान होऊं शकेल. अशा तत्त्वावर अधिष्ठित अशा सौंदर्याच्या शोधात भ्रमणाऱ्या कलावंताला, समजा, एका शरीराच्या ठिकाणीं सौंदर्य आढळलें; त्यापेक्षा अधिक दुसऱ्यात आढळलें, त्याहिपेक्षा सरस असे तिसऱ्यामध्यें दिसून आलें. पण अशा अनेकांमध्येहि काहीतरी उणीव, काहीं वैगुण्य, आढळत राहिलें. तेव्हा ह्या सदोष, अपूर्ण अशाच्यावरून तो कलावत पुढें आपोआपच पूर्णत्वाच्या शोधात, निर्दोष सौंदर्याच्या कल्पनेचे मनन करताना, अंतर्मुख होत जातो. आणि अखेर त्याचें मन उन्नत होत होत एका विशिष्ट स्थितीवर येऊन पोचले म्हणजे अगदीं निर्दोष असें दैवी सौन्दर्य त्याच्या दृष्टीपुढें आपोआप उभें राहतें---त्याच्या चिंतनाची परिणति म्हणून तें त्याला 'खुलें' (reveal) होतें. अशा वेळी त्या मनोज्ञ व कल्पनागोचर अशा स्वरूपाला त्याच्या दृष्टी-पासून लपवून ठेवणारीं गतानुगतिक रूढ कल्पनाचीं, अज्ञानाचीं, संस्कारांची सर्व आच्छादने एकामागून एक गळून पडतात. सूर्याच्या किरणांनीं धुकें वितळून जावें त्याप्रमाणेंच खऱ्या सौन्दर्यज्ञानाचे वेळीं सर्व रूढ कल्पनांचीं पटलें दूर होऊन तें स्वरूप आपल्या दैवी वैभवात, अगदी अनावृत स्वरूपात, दृश्यमान होतें. पाश्चात्त्य वाङ्मयांत कलावंताच्या हृदयाची खरी कल्पना देणारी एक कथा आहे. एका शिल्पकारानें दीर्घकालपर्यंत अविरत श्रम करून सौन्दर्य व यौवन यांनीं संपन्न अशी एक अनावृत स्त्रीप्रतिमा बनविली. त्याच्या

मनाप्रमाणें ती पूर्ण झाल्यावर तो इतका हर्षनिर्भर झाला कीं अष्टौप्रहर तो तिच्याकडे पाहात बसलेला दिसे. ती प्रतिमा म्हणजे त्याचा जीव, त्याचा सारा आनंद होऊन राहिली. त्याच्या ह्या तादात्म्यामुळें ती अचल अशी पाषाण-प्रतिमा नसून प्रत्यक्ष जिवंत आहे असा भास त्याला झाला; तो इतका कीं, बाहेरच्या हिमवृष्टीचा, कडाक्याच्या थंडीचा तिला उपसर्ग होईल, या भीतीनें त्यानें आपल्या अगावरच्या लोंकरीच्या पायघोळ अंगरख्यानें तिच्या त्या निर्दोष देहाला झाकून टाकलें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं तो शिल्पकार स्वत: मात्र त्या प्रतिमेच्या पायाशी थंडीनें गारठून मरून पडलेला आढळला. ह्या दृष्टान्तावरून कलावंताच्या मनोभूमिकेची थोडीफार कल्पना येण्यासारखी आहे.''

हा प्रश्न एवढ्या विस्तारानें येथे चर्चिण्याचें कारण असें कीं अनावृत देहाचें चित्रण करणें किंवा त्यावरून सौन्दर्यचिकित्सा करणें ह्या गोष्टी कलेच्या प्रान्तात जरी बऱ्याच रूढ झालेल्या असल्या तरी त्याबद्दल सामान्य लोकाचें मत फारसें अनुकूल आहे असें म्हणता येणार नाहीं. आणि जें कलेच्या प्रान्तात योग्य व समर्थनीय ठरेल तें सामान्य व्यवहारांत तसें ठरेल असे नाहीं. यामुळें अनावृत देहाचीं चित्रें किंवा शिल्पकलाकृति यांचें प्रदर्शन करताना औचित्याचा विचार करणें अत्यंत अगत्याचें असतें. सवंग लोकप्रियतेच्या मागें लागलेल्या व 'विकतें तें पिकतें' अशी स्वत:ची दिशाभूल करून घेऊन स्थलकाल न पाहता कलेच्या नांवाखालीं नग्नतेचें प्रदर्शन माडणाऱ्या नकली किंवा बनावट कलावंतांकडून कलेच्या खऱ्या स्वरूपाबद्दल अनेक प्रकारचे गैरसमज प्रसृत केले जात असतात. आणि त्यामुळें कलेविषयीं व विशेषत: 'अनावृत'

पणाविषयीं लोकमत अधिकच बिथरत जाऊन बहुजनसमाजाची दृष्टी एकतर अत्यंत सनातनी व अंध बनते किंवा दुसऱ्या टोंकाला जाऊन अत्यंत हीन व गलिच्छ असें कामुक स्वरूप धारण करते. हीं दोन्ही टोकें सौन्दर्यविचाराला विघातक आहेत. यासाठीं 'अनावृत'तेचें नीतिशास्त्र (The Ethics of Nudity) खरोखर काय आहे याचा नीट विचार केला पाहिजे. पण तो विचार पूर्णत्वानें करणें ह्या पुस्तकाच्या कक्षेबाहेरचें असल्यामुळें त्या विषयाचें थोडक्यांत दिग्दर्शन केलें आहे.

चित्रकला आणि शिल्पकला ह्या दोन कला स्थिर अशा जड वस्तूंमधील सौन्दर्याचा आविष्कार करण्याचीं साधनें होत. नृत्याच्या द्वारा प्रतीत होणारें लालित्य हा स्वतंत्र चर्चेचा विषय आहे, तथापि अस्थिर किंवा गतिमान् जड वस्तूंच्याविषयी विचार करावयाचा तो देखील थोड्याफार प्रमाणात वरील दोन कलाच्या साह्यानें आपल्याला करता येईल. चित्रमालिका विशिष्ट प्रकारें डोळ्यांपुढून नेल्याकारणानें जो दृष्टिविभ्रम उत्पन्न होतो त्यामुळेंच चलत्-चित्रपटाची निर्मिती होऊ शकली हें ध्यानात घेतलें असता वरील विधान समजण्याला कठीण पडणार नाही. शिवाय सार्वी स्थिरचित्रेहि गतिसूचक असू शकतात हें आपण प्रत्यही पाहतों.

चित्रकलेमध्यें छायालेखनाचा अंतर्भाव होतो किंवा नाहीं, ह्या प्रश्नाचें उत्तर आता निश्चितपणें असें मिळालें आहे कीं छायालेखन ही केवळ यान्त्रिक गोष्ट नसून ती देखील एक कला आहे; आणि छायालेखनाच्या साह्यानें उत्कृष्ट प्रकारची, कलापूर्ण अशी चित्रनिर्मिती होऊं शकते. रचनातंत्र हें चित्रकलेमध्यें जितकें महत्त्वाचें तितकेंच छायालेखनामध्येंहि त्याचें महत्त्व आहे, आणि

हे महत्त्व ज्यांनीं ओळखलें आहे ते छायालेखनाच्या द्वारा कलात्मक छायाचित्रें निर्माण करूं शकतात. चित्रकाराप्रमाणेंच छायालेखकाला देखील चित्रविषयाशीं तद्रूप व्हावें लागतें आणि त्यांतील माधुर्य बरोबर ओळखून छायाचित्रामधून त्याचा आविष्कार करावयाचा असतो पण कलावंताची दृष्टी असलेला छायालेखकच हें करूं शकतो; इतर छायालेखक नुसती यान्त्रिक प्रतिकृती आपल्यापुढें ठेवीत असतात.

आपल्या दृश्य संवेदना त्रिदिशात्मक असतात. लांबी, रुंदी व जाडी ह्या त्या तीन दिशा किंवा परिमाणें होत. चित्रकार किंवा छायालेखक दोनच परिमाणांनीं (लांबी आणि रुंदी) मर्यादित अशा पृष्ठभागावर, अनेक रंगाच्या साह्यानें किंवा कमीजास्त जाडीच्या रेषांनी, अथवा एकाच रंगाच्या पण कमीअधिक घनतेच्या (फिकट किंवा दाट) छटांनीं तिसऱ्या परिमाणाचा आभास उत्पन्न करीत असतो. पण त्याच वेळीं, वापरलेल्या पृष्ठभागाला जी मर्यादा त्यानें घातलेली असते ती चित्र पाहणाऱ्याच्या दृष्टीलाहि बंधनकारक असल्याकारणानें चित्राचें रसग्रहण करणें ही गोष्ट देखील अधिक सुलभ होत असते. शिल्पकाराची निर्मिती वस्तुत: त्रिदिशात्मक असूनदेखील त्याची कलाकृती पाहणाऱ्याना तो असली मर्यादा घालूं शकत नाहीं. यामुळें शिल्पकलाकृती सर्वच बाजूंनीं परिपूर्ण व निर्दोष करण्याची जबाबदारी त्याच्यावर येऊन पडत असते : नुसता आभास उत्पन्न करण्याची सवलत त्याला नसते. पण त्याचबरोबर सौन्दर्याविष्काराच्या दृष्टीनें त्याला अधिक वाव मिळतो, व यामुळें त्याच्या निर्मितीमध्यें प्रतीत होणारें सौन्दर्य पाहणाऱ्याच्या दृष्टिकोनाबरोबर वेगवेगळें स्वरूप धारण करीत असतें आणि हे

सर्व संभाव्य दृष्टिकोन शिल्पकाराला आधीपासून ध्यानांत आणावे लागतात.

तथापि चित्रकला आणि शिल्पकला याच्या सदरांत मोडणाऱ्या कलाकृती नेहमीं त्रिदिशात्मक– आभासाने किंवा प्रत्यक्षांत– असतातच असे नाहीं. चित्रकलेमध्यें काही प्रकार केवळ द्विदिशात्मक आविष्काराचे असतात. त्यांमध्यें लांबी व रुंदी ही दोनच परिमाणें कल्पिलेलीं असतात. शोभेच्या वेलबुट्टया किंवा नक्षी, रांगोळयाचे प्रकार वगैरे द्विदिशात्मक असतात. त्याना patterns म्हणतात. शिल्पकलेमध्यें देखील एका सपाट पृष्ठभागावर अल्पसा उठाव अगर खोलपणा आणून आकृतींचा आभास उत्पन्न केलेला असतो. त्या पृष्ठभागाला जी सीमा किंवा भूमितिदृष्टया जी आकार-मर्यादा दिलेली असते तिच्यामध्येंच शिल्पकारानें आपलें रचनाकौशल्य दाखवावयाचें असतें. अशा प्रकाराला relief work म्हणतात.

शिल्पकलेमध्ये रंगाचा प्रश्न सहसा उद्‌भवत नाहीं आणि जेव्हा तो उद्‌भवतो तेव्हा तो गौण असतो. मूर्तिकारानें रंगीत मूर्ती केल्या तरी त्या मूर्तींची घडण हीच कलेच्या दृष्टीनें महत्त्वाची गोष्ट गणली जाते. चित्रकलेमध्यें मात्र रंगाचा प्रश्न उद्‌भवतो आणि बऱ्याच वेळा तो फार महत्त्वाचा होऊन बसतो. रंगांची मोहिनी सर्वांवरच पडते आणि रंगांची निवड ही चित्रकलेमध्यें फार महत्त्वाची गोष्ट समजली जाते. तथापि ज्या आकारावर अथवा घडविलेल्या आकृतीवर रंग अधिष्ठित झालेले असतात त्या आकृतीला काहीं ते गौणत्व आणूं शकत नाहींत. आकृतीखेरीज किंवा स्थलमर्यादेखेरीज रंगविचार व्यवहाराच्या दृष्टीनें अशक्यच आहे. थोडेंसें पुढें जाऊन असें म्हणतां येईल की कलेच्या दृष्टीनें आकृ-

तीला (form) स्वतत्र अस्तित्व असतें पण रंगांचें अस्तित्व मात्र आकृतीवरच अधिष्ठित राहणार. रंगाला स्वतंत्र अस्तित्व कलेच्या दृष्टीनें नाहीं. शिवाय रगाची मोहिनी वैषयिक (sensuous) असते, ती बौद्धिक नसते असाच सिद्धान्त कलेच्या प्रान्तांत आता मान्य करण्यात आला आहे. याचें कारण असें की एकाच चित्रांतील किंवा दृश्यामधील वेगवेगळे रग एकाच रंगाच्या (monochrome) निरनिराळ्या घनतेच्या छटाच्या साह्यानें सूचित करतां येतात. चित्रकलेची चिकित्सा करतांना चित्रामधील समतोलपणा पाहण्यासाठीं हीच कसोटी लावण्यात येत असते. एकाद्या व्यक्तीचें सौंदर्य तिच्या छायाचित्रावरून किंवा एकरगी चित्रावरून बरेंचसें अजमावता येते. कारण छायाप्रकाशाच्या साह्यानें त्या व्यक्तीच्या शरीराची किंवा अवयवाची घडण पूर्णपणें प्रतीत होऊं शकते. त्यासाठी अनेक रगाची आवश्यकता मुळींच नसते.

वरील विवेचनावरून सौदर्यमीमासेमध्यें रंगाचें वास्तविक महत्त्व किती याची थोडीशी कल्पना येण्यासारखी आहे. रंगाच्यापुरतें एकादे चित्र अगदी उत्कृष्ट असूनसुद्धा आकृतिदोपामुळें (defective outline) अथवा रचनादोपामुळें (defective composition) ते चित्र हिणकस किंवा हलक्या प्रतीचे ठरेल. कुणावरहि त्याची मोहिनी पडणार नाही. तसेंच अंगकाति रगाच्या दृष्टीनें कितीहि समृद्ध असली तरी शरीर बेडौल असले तर त्याचें आकर्षण नष्टप्राय होत असते, हा नित्यातला अनुभव आहे. अर्थात् रगाचे महत्त्व हें स्वरूपाच्या महत्त्वापेक्षा कमी असतें हें सहज दिसून येईल.

चित्रकला आणि शिल्पकला यांमध्यें सौदर्यनिर्मितीच्या दृष्टीनें

कोणत्या गोष्टींना प्राधान्य असतें ह्याचा काहींशा विस्तारानें विचार करण्याचें कारण असें कीं स्थिर पार्थिव सौदर्याचा अविष्कार करणाऱ्या ह्या दोनच कला आहेत. अर्थात् त्या कलामधून प्रतीत होणारे सौदर्य कोणत्या गोष्टींवर आधारलेलें असतें हें समजून घेतलें तर आपल्या सौदर्यचिकित्सेला योग्य वळण लागण्याचा संभव आहे. वर उल्लेखिलेल्या दोन कलाच्या मूलतत्त्वाचा विचार केला असतां असें दिसून येईल कीं त्याच्या द्वारा प्रतीत होणारें सौदर्य ज्या अनेक गोष्टींवर किंवा उपांगांवर अवलंबून असतें त्यांची महत्त्वाच्या दृष्टीनें खालीलप्रमाणें वर्गवारी लावता येईल.

(१) **प्रमाणबद्धता** : कोणत्याहि गोष्टींतील शाश्वत सत्य शोधून काढावयाचें असेल तर आपल्याला तत्त्वज्ञान्याच्या तर्कशुद्ध व सत्यान्वेषी दृष्टिकोनाचाच अवलब करावा लागतो. आवश्यक घटक कोणते आणि आकस्मिक घटक कोणते हें ठरविताना अत्यंत चिकित्सक बुद्धीनें हरएक घटकाचें मूल्यमापन करणें हें अपरिहार्य असतें. उपलब्ध असलेल्या सर्व कलाकृतींचें परिशीलन केले असता सौदर्याचें अधिष्ठान प्रमाणबद्धता आणि समतोलपणा या दोन गुणावरच मुख्यतः असते ही गोष्ट तत्त्वज्ञानी प्रवृत्तीच्या ग्रीक लोकांनींच बरोबर ओळखली होती असें दिसून येईल. त्यांनीं आपल्या डोळ्यापुढें ठेवलेलें गमक कोणत्याहि देशातील व कोणत्याहि कालातील कलाकृतींच्या परीक्षणाच्या दृष्टीनें महत्त्वाचें असें मानलें जात आहे. आणि त्या काळीं निर्माण झालेल्या शिल्पकलाकृती अद्यापहि जगातील सर्वांत अधिक मानाचें स्थान मिळवून बसल्या आहेत.

प्रमाणबद्धता हा सौन्दर्याचा आत्मा आहे. कारण त्या एका

गुणाच्या अभावीं सौन्दर्यकल्पनेमध्यें समाविष्ट होणारे इतर सर्व तपशील परिणामशून्य ठरतात. प्रत्येक जातीमध्यें शारीरिक वैशिष्ट्यें असतात आणि तीं वैशिष्ट्यें जास्तींत जास्त प्रमाणांत ज्या व्यक्तीमध्यें आढळून येतात ती व्यक्ती त्या जातीपुरती सुंदर समजण्यात येते ही गोष्ट यापूर्वींच सागितली आहे. तथापि सौन्दर्याविषयींची ही कल्पना व्यापक स्वरूपाची नसून शास्त्रीयदृष्टया सदोष आहे. जगांतील सर्व जातींचे उत्कृष्ट नमुने एकत्र आणून त्यामध्यें सरसनीरस ठरवावयाचें झालें तर अशा वेळीं जातिनिष्ठ कल्पनांना आपल्या चिकित्सेमध्ये मुळींच स्थान मिळणार नाहीं, आणि मिळता कामा नये. कोणत्याहि गोष्टींतलें अतिम सत्य हें एकच असलें पाहिजे व त्याची चिकित्सा देखील जातिनिरपेक्ष दृष्टीनें करतां आली पाहिजे, तरच त्याला तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने कांही महत्त्व. सौंदर्यशास्त्र हा तत्त्वज्ञानाचाच एक विभाग आहे. नीतिशास्त्र, ब्रम्हशास्त्र इत्यादि इतर विभागाविषयीं जितका विचार आतापर्यंत झालेला आहे तेवढा विचार सौदर्यशास्त्राबद्दल झालेला नाहीं हें खरें आहे. पण ही एक आकस्मिक स्वरूपाची गोष्ट आहे असेंच म्हटलें पाहिजे. तथापि ह्या शास्त्राकडे आता लोकाचे लक्ष वेधू लागलें असून उत्तरोत्तर त्याची वाढ होण्याचाहि बराच संभव आहे

जगाच्या पाठीवर अस्तित्वांत असलेल्या सर्व जातींमधील सुंदर स्त्रिया एकत्र आणल्या असताना त्याच्यामध्यें सौदर्याच्या दृष्टीनें अनुक्रम लावतां येतो व तो पाहताक्षणी सहज पटण्याजोगा असतो. अर्थात् हा अनुक्रम लावताना नकळतच आपल्या मनांत प्रच्छन्नपणे काम करीत असणारी प्रमाणबद्धतेची कल्पना आपल्या मनावर मोठाच परिणाम करींत असते. सर्वांत सुंदर स्त्री देखील

प्रमाणबद्धतेच्या दृष्टीनें अगदीं निर्दोष असेल असें मानण्याचें कारण नाहीं. पण प्रमाणबद्धतेच्या आपल्या मनांतल्या कल्पनेशीं ती जास्तींत जास्त जवळ असेल.

प्रमाणबद्धता म्हणजे अवयवांची एकमेकांशीं आणि एकंदर शरीराशीं परिमाणाच्या अथवा मोजमापाच्या दृष्टीनें असणारी सुसंगती. अशा प्रकारची सुरम्य सुसंगति हेंच सौन्दर्याचें सर्वांत महत्त्वाचें अधिष्ठान होय. ह्याचें कलात्मक, व्यापक ज्ञान सामान्य माणसांना नसलें तरी त्याची मर्यादित जाणीव सर्वांनाच असते.

अगदीं अलीकडे, कोणत्याना कोणत्या तरी गूढ नावाखालीं किंवा प्रथेखालीं जन्मलेली, सहज कळून येण्याजोगी व बुद्धिपुरस्सर अवलंबिली जाणारी प्रमाणहीन किंवा निश्चितपणें विकृत स्वरूपाची चित्ररचना चिरकाल टिकाव धरूं शकणार नाही. कारण तिच्यामधील कल्पित गुणापेक्षा तिच्यांतील स्पष्टपणें दिसून येणारे दोषच अधिक मोठे असून त्याची उपेक्षा फार काल होणें शक्य नाही. अशा चित्ररचनेमागें काहीं तत्त्वज्ञान किंवा पद्धतशीर विचारसरणी आहे असें कल्पिलें, प्रमाणबद्धतेला अजिबात डावलून चित्रित केलेल्या, असंभाव्य वाटण्याइतक्या कृश किंवा विकृत देहयष्टीच्या द्वारा आणि तितक्याच विकृतपणें चितारलेल्या चेहऱ्यावरील अत्यंत सूक्ष्म असा जो भाव निदर्शनाचा प्रयत्न त्याच्या द्वारा आत्म्याचें प्रतिबिंब किंवा आविष्कार करण्याची ही नवी कला आहे असें क्षणभर मानलें तरी देखील पार्थिव देहाला दिलेलें गौणत्व हा विचाराचा व विवाद्य असा मुद्दा राहतोच. अज्ञेयत्व किंवा कमालीचा गूढपणा म्हणजेच उच्च प्रतीची कला ही कल्पना सर्वमान्य होणें शक्य नाहीं.

**(२) रेखीवपणा** (modelling): अवयवांचा रेखीवपणा अगर घोटीवपणा हा सौंदर्याच्या दृष्टीनें प्रमाणबद्धतेच्या खालोखाल महत्त्वाचा गुण मानला जातो. रेखीवपणाचा विचार प्रत्येक अवयवापुरता स्वतंत्रपणें करता येतो. सर्वच अवयव रेखीव असले तर व्यक्तीच्या सौंदर्यांत निःसंशय पुष्कळच भर पडते, पण एकादा अवयव जरी रेखीव असला तरी त्याची मोहिनी पाहणाऱ्यावर पडल्याखेरीज राहत नाहीं. तथापि चेहऱ्यावरील अवयवांचा रेखीवपणा हा सर्वांत आधीं ध्यानात येतो. या कारणानें चेहरा रेखीवपणामुळें सुंदर असला तर इतर अवयवाकडे थोडेंफार दुर्लक्ष होतें व सामान्यतः सुंदर चेहऱ्याच्या व्यक्तीला सुंदर मानण्यांत येतें. तथापि अवयवाच्या रेखीवपणाला प्रमाणबद्धतेचें पाठबळ नसेल तर मात्र त्याचें महत्त्व एकदम कमी झाल्याशिवाय राहत नाहीं. डोळे रेखीव असूनहि जर एकंदर चेहऱ्याच्या मानाने फार लहान किंवा प्रमाणाबाहेर मोठे असतील तर त्यांच्या सौंदर्यगुणाला बाध आल्याशिवाय राहणार नाहीं. इतर अवयवाच्या बाबतींत हाच नियम लागू पडतो.

**(३) रंग व त्वचेचा मोहकपणा** : प्रमाणबद्धता व रेखीवपणा ह्याच्या बाबतींत आढळून येणारी सर्वसामान्यता रंगाच्या किंवा त्वचेच्या गुणामध्यें सापडणार नाहीं. कारण भौगोलिक परिस्थिती, हवामान आणि जातीचीं वैशिष्ट्यें इत्यादि अनेक घटकांचा या ठिकाणीं विचार करावा लागतो. सामान्यतः गौरवर्ण सर्वांनाच आवडत असला तरी त्यामध्येंहि शुद्ध व तेजस्वी रंगालाच अधिक गुण दिले जातात. चित्रकलेच्या दृष्टीनें गौरवर्ण म्हणजे कांहीं शुद्ध सफेत रंग नव्हे. रुधिराभिसरणादि कारणांमुळे शरिराच्या वेगवेगळ्या अवयवांना निरनिराळ्या रंगाच्या छटा प्राप्त होत असतात आणि

अशा रंगसमृद्धीनें व त्याबरोबरच पुष्कळ वेळां आढळणाऱ्या रंगसंगतीनें आकर्षकतेंत पुष्कळ भर पडत असते. त्वचेचा स्निग्धपणा, मऊपणा, नाजुकपणा व तेजस्वीपणा इत्यादि गुण आकर्षणात निश्चितपणें भर टाकीत असतात.

रंग हा जितका वरवरचा (superficial) आहे तितकाच तो स्वभावत: चचलहि असतो. अगकाति ही वयोमानाप्रमाणें जशी वेगवेगळें स्वरूप धारण करते त्याचप्रमाणें हवामानाचा देखील तिच्यावर परिणाम झाल्याशिवाय राहत नाहीं. पण मनोविकार आणि भावना याच्या उठावणीमुळें शरिरावर व विशेषत: चेहऱ्यावर रंगपालट होतो तो मात्र अतिशय त्वरेनें होत असतो. हा रगपालट जरी क्षणभंगुर असला तरी त्यापासून, त्या वेळापुरतें का होईना, व्यक्तीच्या ठिकाणीं विशेष असें आकर्षण उत्पन्न होतें. कोणत्याहि प्रकारच्या भावना चेतविल्या गेल्या तर, एरवीं अगदीं सामान्य दिसणाऱ्या व्यक्तीच्या ठिकाणीं सुद्धां, नवीनच आकर्षकपणा निर्माण होतो. मात्र हा भावनाचा उठाव खरोखरीचा किंवा प्रामाणिक पाहिजे; त्यात दांभिकपणा अगर कृत्रिमपणा असतां कामा नये. भावनाचा अथवा मनोविकाराचा प्रभाव असेपर्यंत हा फरकहि अस्तित्वांत राहतो.

अंगकांति निसर्गतः कशीहि असली तरी निरोगीपणामुळें त्या व्यक्तीच्या ठिकाणीं असणारें तेज हें कोणाच्याहि डोळ्यांत भरण्यासारखेंच असते. आरोग्याचें आकर्षण हें मुख्यतः त्वचेवरील रगाच्या व तेजस्वीपणाच्या द्वारा प्रतीत होत असतें.

**(४) डौल** (grace) **आणि लयबद्धता** (rhythm) : व्यक्तीच्या आकर्षकपणामध्यें भर टाकणाऱ्या ज्या अनेक गोष्टी आहेत त्यांत

डौलदारपणाचा समावेश अवश्य केला पाहिजे. उभें राहण्याची विशिष्ट प्रकारची पद्धत किंवा कोणत्याहि स्थितीमध्यें मोहक वाटण्याजोगी लकब (pose), एरवीं सामान्य वाटणाऱ्या व्यक्तीच्याहि ठिकाणीं, सौदर्याभास निर्माण करूं शकते. शरीरसौष्ठव (लैंगिक आकर्षणाच्या अर्थानें नव्हे) सर्वांमध्यें कमीजास्त प्रमाणात असतें पण त्याचा योग्य असा आविष्कार ज्या स्थिर अथवा गतिमान् स्थितीमध्यें होत असतो त्यालाच आपण डौल म्हणतों. लयबद्धता ही गतिमान् स्थितींतील डौल आहे असेंहि म्हणता येईल. चालण्याच्या किंवा हालचालींच्या जशा आकर्षक रीति किंवा प्रकार असतात तसेच निश्चितपणें बेडौल असेहि प्रकार असतात. स्त्रीच्या विषयीं आपल्या ज्या अपेक्षा व कल्पना असतात त्यामध्यें मार्दव आणि सुरम्य लालित्य हे दोन महत्त्वाचे गुण आहेत. हे दोन गुण ज्या प्रकारच्या गतीनें किंवा हालचालीने खुलून दिसतील ती पद्धत आपल्याला मनोरम वाटते. यामुळेंच पुरुषासारखें छाती पुढें काढून अथवा लांब पावलें टाकीत किंवा उडत चालणें हे स्त्रियांच्या बाबतींत अगदीं विचित्र व वाईट दिसतें. याच्या उलट स्त्रीदेहामधील नैसर्गिक मार्दव आणि रेखीव, वळणदार अशा मर्यादारेषांनी साधलेलें लालित्य ज्यामुळें अधिकच खुलून दिसेल अशा सौम्य गतीचीं चाल स्त्रीला नवीनच सौंदर्य प्राप्त करून देते. गजगति, हंसगति इत्यादि विशेषणें हालचालींतील डौलदारपणा आणि लयबद्धता ह्या गुणाची नयनरम्यता दर्शविणारीं आहेत. ह्या गुणांना प्रमाणबद्ध शरीराची जोड असेल तर अशी स्त्री उत्कृष्ट कलाकृतींचें स्फूर्तिस्थान होऊन बसेल यात संशय नाहीं

वर दिलेल्या चार गुणावर सौंदर्याचें अधिष्ठान मुख्यतः असतें;

आणि सौंदर्याची पारखहि वरील गुणांच्या निकषावर करतां येते. तथापि सौंदर्याची ही चिकित्सा सर्वमान्य होईल असें सांगतां येणार नाहीं. कारण, वरील सर्व गुण पार्थिव देहावर अधिष्ठित असल्यामुळें, ज्याला अंत सौदर्य किंवा मानसिक सौंदर्य (spiritual beauty) म्हणतात त्याला आपल्या सौंदर्यचिकित्सेमध्यें स्थानच नाहीं कीं काय, असा प्रश्न उदभवणे साहाजिक आहे.

मानसिक सौंदर्य म्हणजे काय? तें कशाच्या द्वारा प्रतीत होतें?

हे प्रश्न फार गुंतागुंतीचे आहेत. कोणत्याहि व्यक्तीचें अस्तित्व तिच्या पार्थिव देहाच्या द्वारा आपणाला जाणवतें. त्या व्यक्तीबद्दल मनांत विचार येतांच आपल्या डोळ्यांपुढें त्या व्यक्तीचें शरीर उभें राहतें आणि शरीराच्या जाणिवेखेरीज आपले विचार त्या व्यक्तीशीं संबद्ध होऊंच शकत नाहींत. तें शरीर सुंदर असलें तर त्या व्यक्तीला आपण सुंदर समजतों. पण सुंदर शरीर नसताहि एखादी व्यक्ती आपल्या विचारानीं किंवा कृतीनें आपल्या गूढ नैतिक भावनांचा उठाव करूं शकते. आपण त्या व्यक्तीच्या सान्निध्यांत मोहून जातों, मंत्रमुग्ध होतों. यापूर्वीं सौंदर्याची जी कल्पना आपण गृहीत धरली आहे तिच्या अनुरोधानें अशा व्यक्तीच्या ठिकाणीं सौंदर्य असलें पाहिजे– त्या सौंदर्याचा प्रकार वेगळा असूं शकेल– ही गोष्ट मान्य करावीच लागेल. अर्थात्, मानसिक सौंदर्य म्हणून काहीं आहे असें ठरल्यानंतर त्याबद्दलहि चिकित्सा करणे क्रमप्राप्त आहे.

जीवन हा शब्द अर्थाच्या दृष्टीनें शारीरिक अस्तित्वापेक्षां व्यापक आहे. जीवनांत देह आणि मन ह्या दोहोंचेंहि महत्त्व आहे. मनाला देहातीत असें स्वतंत्र अस्तित्व आहे किंवा नाहीं हा तत्त्वज्ञानाचा प्रश्न आहे. तथापि त्या प्रश्नाचा निर्णय लागला नसला

तरी देखील व्यवहारांत शरीरापेक्षा भिन्न असें मनाचें अस्तित्व आपण मान्य करीत असतों. शरीरधर्म सर्व प्राणिमात्रांना आहेतच. तथापि मनुष्यप्राण्यामध्यें शरीरधर्मांच्यापेक्षां वेगळें असें स्वतंत्र व्यवहारक्षेत्र आहे. त्यातील सर्व व्यवहार हे ज्ञान (knowing), भावना (feeling) आणि इच्छाशक्ति (willing or volition) ह्या त्रयीच्या साह्यानें चाललेले असतात. ह्या तीन शक्तींनीं मानवाला इतर प्राण्यापेक्षां वेगळें व उच्च असे स्थान मिळवून दिलेलें आहे. त्याचे जीवन, अर्थातच, शरीधर्म आणि ह्या तीन शक्ती यांच्या संयोगानें बनलेले आहे.

गूढ भावनांचा उठाव करून उच्च प्रतीचा आनंद किंवा समाधान देणारें तें सौदर्य असें म्हटल्यानंतर सौंदर्याचें वर्गीकरण त्याच्या उगमस्थानाच्या अनुरोधाने करतां येईल. पार्थिव देहाच्या ठिकाणीं असणाऱ्या गुणविशेषामुळें उत्पन्न होणारें तें पार्थिव सौंदर्य आणि मानसिक म्हणजे, विचार, भावना आणि इच्छाशक्ती याच्या प्रान्तात आढळून येणाऱ्या गुणविशेषामुळे निर्माण होणारें तें मानसिक सौंदर्य असें म्हणतां येईल.

मानसिक सौंदर्य व्यक्त कसें होतें याविषयी विचार केला असता असें आढळून येतें की विचार, भावना आणि इच्छा (ईषणा) वेगवेगळ्या रीतींनीं व्यक्त करता येतात. वाचच्या द्वारा विचार व्यक्त केले जातात तेव्हां त्या विचारांच्या प्रभावानें बोलणाऱ्याच्या चेहऱ्यावर देखील सहज दिसून येण्याजोगा फरक होतो. बुद्धिमान मनुष्याच्या चेहऱ्यावरच त्याची बुद्धी— न बोलताहि— प्रकट होत असते. चेहऱ्यावरील अवयवांमध्यें डोळे हे ह्या दृष्टीनें सर्वांत महत्त्वाचे. त्याच्यामध्यें होणारा तेजोमय फरक अनेक प्रकारच्या

मनोव्यापाराना व्यक्त करण्याचें प्रभावी साधन आहे. मनोव्यापार अर्थातच, विचार, भावना आणि ईषणा यांपैकीं कोणत्याहि एका प्रकारचे, अथवा संमिश्र देखील असू शकतील.

मनोव्यापाराचा परिणाम एकदर शरीरावर होत असतो; चेहऱ्यावर तो अधिक स्पष्ट दिसतो. पण हा परिणाम निश्चित स्वरूपाचा किंवा सर्वसामान्यहि नसतो हें ध्यानात ठेवलें पाहिजे. कारण अत्यंत कठिण किंवा आणीबाणीच्या प्रसंगीं देखील आपल्या मनातील खळबळ इतरांना मुळींच न कळू देण्याइतका निर्विकार चेहरा ठेवणारीं माणसें असतात. अर्थात्, शरीरावर किंवा चेहऱ्यावर होणाऱ्या परिणामाच्या किंवा फरकाच्या द्वारा मनोव्यापाराची सखोलता विश्वसनीय रीतीनें अजमाविता येणार नाहीं, ते आविष्काराचें एक साधन आहे एवढेच म्हणता येईल.

व्यवहारात मानसिक सौंदर्याच्या उपस्थितीला शारीरिक सौंदर्याची जोड असणें अवश्य आहेच असें नाहीं. ह्या दोन प्रकारच्या सौंदर्यांचे अस्तित्व एकमेकावर अवलंबून नसतें. तथापि ह्या दोहोंमध्यें अगदींच संबंध नाहीं असें नाहीं. एकाच व्यक्तीच्या ठिकाणीं ह्या दोहोंचा समन्वय झालेला असेल तर ती व्यक्ती एक दैवी शक्तीच होईल. आपल्या सान्निध्यानें आणि प्रभावानें ती इतराच्या जीवनामध्येंहि सौंदर्य आणि आनंद निर्माण करूं शकेल.

शुद्ध अशा पार्थिव सौंदर्याचा प्रभावहि असा असतो कीं इतराच्या मनामध्यें सात्त्विक आणि उच्चतम अशा भावना जागृत करून तें अप्रत्यक्षपणें मानसिक सौंदर्याला जन्म देतें. सुंदर व्यक्तींच्या सान्निध्यामुळें इतराचें जीवनहि सौंदर्यपूर्ण होत असतें. हाच सौंदर्याचा दैवी गुण आहे. ज्योतीचा प्रकाश अणुमात्र कमी न होता अनेक

ज्योतींना ती चेतवूं शकते त्याचप्रमाणें सौंदर्य, मग तें शारीरिक असो किंवा मानसिक असो, चोंहीकडे सौदर्यच चेतवीत असतें.

कादंबरीकार आपल्या नायक-नायिकाचे मानसिक सौदर्य दाखवितांना बहुशः त्याच्या शारीरिक सौदर्याच्या बाबतींतहि तितकेच, किंबहुना अधिकच, चोखंदळ असतात. अप्रकटपणें आपल्या आवडींनिवडींवर देखील सत्ता चालविणारी सौंदर्यासक्ति हीच याचें खरें कारण होय. मानसिक सौंदर्याला शारीरिक सौदर्याची जोड असावी असेंच आपल्याला वाटत असतें.

चित्रकला आणि शिल्पकला याच्या द्वारा निर्माण केल्या जाणाऱ्या कलाकृतींच्या मध्यें केवळ शारीरिक सौंदर्य दाखविलेले असतें असें नाहीं. जीवनामध्यें आवश्यक व मूलभूत असलेल्या कल्पनाचा आविष्कार कलेच्या द्वारा झाला पाहिजे. तरच ती उच्च प्रतीची कला ठरूं शकेल. मानवाचें जीवन विविध अशा घटकानीं आणि वैचित्र्यानीं परिपूर्ण असें असतें. त्यांत जसें पार्थिव देहाला महत्त्व आहे तसेंच मनोव्यापारांनाहि आहे. जीवनाची ही दोन्हीं अंगें योग्य प्रमाणात उमटवून मानवी जीविताची कोणती तरी स्थिति सुचविणें हें कलेच्या जिवंतपणाचें लक्षण आहे.

पार्थिव सौदर्याच्या रसग्रहणाला व्यक्तीच्या दर्शनाची अथवा निदान प्रतिमारूपानें मिळणाऱ्या त्याविषयींच्या मर्यादित ज्ञानाची अपेक्षा असते. ह्या कामी शाब्दिक वर्णनें केव्हांहि अपुरींच ठरणार. प्रत्येक प्रकारच्या सौदर्यानुभूतीचे माध्यम वेगळें असतें. चित्रद्वारा प्रतीत होऊं शकणारें सौदर्य वाङ्मयद्वारा देखील तितक्याच यशस्वीपणें व्यक्त करतां येईल ही कल्पनाच भ्रममूलक आहे. कारण, हा फरक केवळ साधनाचा नसून सौदर्यानुभूतीच्या प्रकाराचा

आहे. चित्रकार आणि शिल्पकार यांच्या दृष्टीमध्यें आणि सौंदर्यानुभूतीमध्यें सुद्धां बराच फरक असतो, आणि तो केवळ परिमाणाचा नसून प्रकाराचा देखील असतो.

शरीरावर आणि चेहऱ्यावर होणाऱ्या परिणामांवरून किंवा फरकावरून मनोव्यापार अशतः अजमावता येत असले तरी ते विश्वसनीयरीत्या व पूर्णपणें व्यक्त होऊं शकत नाहींत. अर्थात्, त्याच्याविषयींचें संपूर्ण व सम्यक् ज्ञान होण्यासाठीं अन्य प्रकारच्या साधनांची अपेक्षा असते. तथापि आपल्याला दुसऱ्यांच्या मनोव्यापारांची जाणीव व्हावयाची असेल तर त्याना कोणत्या तरी प्रकारच्या संवेदनक्षम स्वरूपाचें साह्य घ्यावेंच लागतें. शेंकडों वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या कवींच्या, तत्त्वज्ञान्याच्या अथवा संताच्या मानसिक सौंदर्याचें स्वरूप त्यानीं लिहून ठेवलेल्या ग्रंथगत विचाराच्या द्वारा आपल्याला अनुभविता येतें. हजारों मैलावरून ध्वनिद्वारा प्रक्षिप्त होणारें एखाद्या व्यक्तीचें विचारसौंदर्य आकाशवाणीच्या (रेडिओच्या) साह्यानें आपल्या मनाला आन्दोलनें देऊं शकतें. मानवी जीवनाच्या वाढत्या विविधतेबरोबरच मानसिक सौंदर्यानुभूतीच्या साधनामध्येंहि विविध प्रकार निर्माण होत जाणार.

मनुष्याचें मन ही एक चमत्कृतिपूर्ण व अत्यत गूढ अशी वस्तू आहे आणि त्याचें संपूर्ण ज्ञान होणे ही गोष्ट साऱ्या विश्वाच कोडें उलगडण्याइतकीच कठीण आहे. यामुळें मानसिक सौंदर्याविषयींची चर्चा म्हणजे एक प्रचंड असा ग्रंथच होईल. ह्या लहानशा पुस्तकामध्यें अशा अतिविस्तृत विषयाचा ऊहापोह करणें शक्य नसल्यामुळें व तो माझा मुख्य उद्देशहि नसल्यानें येथें अगदीं थोडक्यात त्याचा उल्लेख केला आहे.

सौदर्यकल्पना ह्या आपल्या जीवनाशीं निगडित असल्यामुळें त्यांमध्यें शारीरिक व मानसिक असे प्रकार ज्याप्रमाणें पडतात त्याचप्रमाणें कोणत्याहि कालीं प्रचलित असणाऱ्या सौदर्यकल्पने-मध्यें शाश्वत आणि नैमित्तिक किंवा तत्कालीन प्रवृत्तींचे निदर्शक असे भिन्न प्रकारचे घटक असतात असेंच दिसून येईल. पार्थिव सौदर्याच्या कल्पनेमध्यें प्रमाणबद्धता, रेखीवपणा, वगैरे शाश्वत ठरलेल्या कल्पनाना, त्या त्या कालीं अस्तित्वात असलेल्या वेशभूषा, अलंकारादींच्या प्रकारांची (fashions) जोड मिळत असते, व त्याचबरोबर मानसिक सौदर्याच्या क्षेत्रात तत्कालीन वैचारिक (धार्मिक, नैतिक, बौद्धिक इत्यादि) प्रवृत्तींचें प्रभुत्व दृष्टोत्पत्तीस येतें. अर्थात्, कोणत्याहि देशांतील व कालातील सौदर्यकल्पना त्या त्या देशाच्या व त्या त्या कालाच्या जीवनक्रमावर अधिष्ठित झालेल्या असल्यामुळें तत्कालीन जीवनक्रमांतील वैशिष्ट्यें व प्रवृत्ती त्यांमध्ये प्रतिबिंबित होत असतात.

वरील सर्व गोष्टी ध्यानात घेऊन सौदर्याच्या मूल्यमापनामध्यें आपल्याला अनेक उपागें कल्पून त्यांचा वेगवेगळा विचार करणें अवश्य आहे.

असा विचार करतांना शरीरसौष्ठवाला प्रथमस्थान द्यावें लागेल. कारण, पूर्वी सांगितल्याप्रमाणें, पार्थिव देहाच्या बाबतींतच प्रमा-णादि परिमाणाचा विचार निश्चितपणें करता येतो, व आपले सिद्धान्त किंवा चिकित्साहि सर्वांना सहज कळण्याजोग्या रीतीनें माडतां येणें शक्य असतें.

शरीरसौष्ठवाच्या नंतर वस्त्राभरणें व वेषभूषा यांविषयीं विचार करावा लागेल. शारीरिक व्यंगें किंवा दोष वस्त्राभरणाच्या किंवा

अलंकारांच्या साह्यानें लोकांच्या दृष्टीपासून शिताफीनें बऱ्याच प्रमाणांत लपवितां येतात. याच्या उलट, अत्यंत निर्दोष देहाचें सौंदर्य विचित्र व सदोष वेशभूषेनें पुरेसें बिघडवून टाकतां येतें ही गोष्ट आपण प्रत्यहीं पाहतों. या कारणानें, वेशभूषेमागील तत्त्वें व तपशीलाचे प्रश्न याचा देखील थोड्याफार प्रमाणात विचार करणें क्रमप्राप्त आहे.

या खेरीजहि अनेक प्रकारचे प्रश्न स्त्रीसौंदर्याविषयींचा विचार करतांना आपल्यापुढें उभे राहतील. अशा सर्व प्रश्नांचा ऊहापोह थोड्याफार व्यावहारिक दृष्टीनें पुढील विभागांत करण्याचें योजिले असून शक्य त्या ठिकाणीं चित्राच्या साह्यानें कांहीं मुद्दयाचें स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न मी करणार आहें.

# स्त्रीसौंदर्य

आतांपर्यंत केलेल्या चर्चेमध्यें स्त्रीविषयक आणि सौंदर्यविषयक कल्पनाचा कांहींसा तात्त्विक दृष्ट्या व त्याबरोबरच थोड्याफार व्यावहारिक दृष्टिकोनांतूनसुद्धां ऊहापोह केला आहे. पहिल्या विभागांत स्त्रीत्वाचे सर्वमान्य गुणविशेष कोणते व सामान्यतः स्त्रीजातीच्या ठिकाणीं कोणतीं वैशिष्ट्यें अपेक्षिलीं जातात याबद्दल विवेचन केलें आणि दुसऱ्या विभागात सौंदर्यकल्पनाचें तात्त्विक विवेचन करून त्याच वेळीं तद्विषयक रूढ कल्पनाचेंहि अल्पसें दिग्दर्शन केलें आहे. आतां ह्या दोहोंचा समन्वय करून स्त्रीसौंदर्यविषयक तपशिलाचे व व्यावहारिक स्वरूपाचे कांहीं विचार मांडण्याचा मी प्रयत्न करणार आहें.

स्त्री व पुरुष यांच्यामधील शारीरिक भेद कोणते याची चर्चा यापूर्वीं थोडीशी केलीच आहे. स्त्रीचा देह उंचीच्या आणि एकंदर आकाराच्या दृष्टीनें पुरुषदेहापेक्षां ल्हान आणि वेगळ्या घडणीचा आहे ही गोष्टहि स्पष्ट अशी आहे. पुरुषाच्या ठिकाणीं सामर्थ्य व कणखरपणा या गुणांची अपेक्षा केली जाते, तर स्त्रीच्या ठिकाणीं मार्दव, नाजुकपणा इत्यादि गुण असले पाहिजेत असें आपण गृहीत धरून चालतों. कष्टाळूपणा, चिकाटी हे गुण पुरुषापेक्षां बहुशः स्त्रीच्या ठिकाणींच अधिक प्रमाणांत असलेले अनुभवास येत असले तरी मोठ्या श्रमाचीं अथवा शक्तीचीं कामें स्त्रियांनीं करावीं अशी अपेक्षा सामान्यतः केली जात नाहीं. निष्क्रियतेमुळें व ऐषआरामाच्या राहणीमुळें कांही पुरुषांच्या ठिकाणचे सामर्थ्यादि

गुणविशेष नष्ट झालेले आपण पाहतों त्याचप्रमाणें नैसर्गिक दौर्बल्य, असहायता इत्यादि वैशिष्ट्यांनी युक्त स्त्रीजातीपैकीं कांहींना पुरुषी काबाडकष्टाचीं, शक्तीची कामें अस्तित्त्वासाठीं किंवा आयुष्याची दिशा चुकल्याकारणानें करण्याची वेळ आलेली आपण पाहतों. हे दोन्ही प्रकार अनुकपनीय आहेत.

स्त्री आणि पुरुष याचीं वर उल्लेखिलेलीं प्रमुख शारीरिक वैशिष्ट्यें ध्यानात ठेवून तीं चित्रकलेमध्यें अत्यंत सोप्या पद्धतीनें कशीं प्रदर्शित करता येतील हें पाहणें आपल्या चर्चेला बरेच उपयुक्त ठरण्याचा संभव आहे. कोणत्याहि वस्तूची आकृती रेषांच्या साह्यानें काढणें ही चित्रकलेमध्यें अत्यत प्राथमिक स्वरूपाची गोष्ट मानली जाते. म्हणून रेखाकृतींच्या साह्यानें स्त्री व पुरुष याचीं वैशिष्ट्यनिदर्शक चित्रे काढण्याचा प्रयत्न करूं.

रेषा दोन प्रकारच्या कल्पितां येतात. उगमस्थानापासून एकाच



दिशेनें प्रवास करणाऱ्या त्या सरळ रेषा आणि वारंवार दिशा बदलत जाणाऱ्या त्या वक्र रेषा. गति व सामर्थ्य हे सरळ रेषांचे

गुणधर्म. याच्या उलट लालित्य आणि मार्दव हे वक्र रेषेचे स्वभाव-विशेष होत हें सहज पटण्याजोगें आहे.

आकृति एकाच रेषेनें बहुशः काढता येत नाही. अनेक रेषांच्या संयोगानें आकृती पूर्ण करावी लागते. अर्थात्, रेषाचा असा संयोग अनेक प्रकारानीं करता येतो.

रेषा काटकोनामध्यें सांधलेल्या असतील किंवा त्यांमध्यें त्यापेक्षां कमी अंशाचा कोन झालेला असेल. सरळ रेषामध्येंहि कोन जस-जसा लहान होत जाईल तसतसा तो सांधा दृष्टीला अधिक सुख-कर वाटूं लागेल. तसेंच साध्याच्या बिंदूपासून निघणाऱ्या वक्र रेषा जितक्या एकमेकींशीं विशेष दूर नसलेल्या अशा दिशांनीं जातील तितका डोळ्यावर होणारा परिणाम अधिक सुखकर व लालित्य-पूर्ण होत जाईल.

रेषाच्या सरळ व वक्र ह्या दोन प्रकाराचा व सांध्याच्या ठिकाणीं साधलेल्या कोनावरून उत्पन्न होणाऱ्या कमीअधिक लालित्याचा, स्त्रीपुरुषाच्या वैशिष्ट्यनिदर्शक रेखाचित्रामध्यें आपल्याला उपयोग करून घेता येईल. स्त्रीची आकृती तिच्या वक्र अशा मर्यादारेषानीं वळणदार व लालित्यपूर्ण दिसते हें लक्षांत येण्याजोगें आहे. तीच आकृती सरळ रेषा आणि काटकोनी सांधे यांनी रचण्याचा प्रयत्न केला तर ती निश्चितपणें स्त्रीस्वभावविरोधी व राकट दिसूं लागेल.

स्त्रीदेहाचें लालित्य व नयनरम्यता व्यक्त करण्यासाठीं वक्र रेषा व सौम्य-संयोगी साधे यांचाच उपयोग करावा लागतो ही गोष्ट पुरातन कालापासून चित्रकार आणि शिल्पकार यानीं ओळखली होती असें दिसून येईल. प्राचीन चित्रें व शिल्पकलाकृती याच्या-मध्यें ह्याच तत्त्वाचा भरपूर उपयोग करून घेतलेला दिसून येतो.

हा परिणाम साधण्यासाठीं, अर्थातच, स्त्रीच्या देहामध्यें विशिष्ट प्रमाणांत मासलपणा असला पाहिजे हें क्रमप्राप्त आहे. उच्च प्रतीच्या



ग्रीक शिल्पांकडे अथवा यथावस्तु (realistic) चित्राच्या पाश्चात्य नमुन्यांमध्यें ही गोष्ट कलावंतांनीं मान्य केली होती असेंच दिसून येईल. प्रमाणबद्धतेच्या दृष्टीनेहि फाजील कृशपणा हानिकारकच ठरतो. कांहीं कालपर्यंत प्रचलित असलेली कृशसौंदर्याची कल्पना चिरकाल मान्य होऊं शकली नाहीं याचें कारण ती स्त्रीदेहाचें स्वाभाविक लालित्य आणि प्रमाणबद्धता यांच्याशीं विसंगत होती. "Streamlined-body" किंवा योग्य प्रमाणात असलेल्या मासलपणामुळें वळणदार असलेलें शरीर हें, मध्येंच उपस्थित झालेल्या कृशसौंदर्याला मागें सारून पुन: कलेमध्यें पहिलें स्थान मिळवून बसलें आहे.

लवचिकपणा किंवा सहजतेनें वेगवेगळ्या स्थिति (poses) धारण करण्याची पात्रता हा स्त्रीदेहाचा दुसरा गुण होय. नृत्यकलेमध्यें स्त्रियाना मिळणारें यश ह्या गुणावरच अवलंबून असतें. लयबद्धता ही पुरुष व स्त्री या दोहोंच्याहि नृत्यामध्यें आढळली तरी पुरुषाच्या नृत्यामध्ये सामर्थ्यनिदर्शक खटकेबाजपणा अधिक प्रमाणांत प्रतीत

होईल. स्त्रीच्या नृत्यामध्यें मात्र शरिराच्या ठिकाणीं असणाऱ्या लवचिकपणामुळें मार्दवपूर्ण असें नयनरम्य लालित्य आढळेल.



स्त्रीदेहाचें सौदर्य ज्यांवर अधिष्ठित असतें अशा वैशिष्ट्यांपैकी वर लिहिलेलें वैशिष्ट्य प्रामुख्यानें लक्षात येणारें आहे. वळणदार मर्यादारेषाच्या साह्याखेरीज स्त्रीदेहाच्या रम्यतेची कल्पना पूर्णत्वानें येणेंच शक्य नाहीं.

बाल्यावस्थेपासूनच स्त्रीच्या शरीराची वाढ पुरुषाच्या वाढीपेक्षां थोड्याशा वेगळ्या प्रकारानें होत असते. तारुण्यप्राप्तीनंतर जो भेद अत्यंत स्पष्टपणें दिसून येतो तो अगदीं बाल्यावस्थेपासून अंशा-अंशानें उत्पन्न होत असतो. वास्तविक वयाच्या दहा बारा वर्षां-पर्यंत चेहऱ्यावर हा फरक फारसा प्रतीत होऊं शकत नाहीं. मुलांचे केस मुलींच्या केसांप्रमाणें वाढविले तर केवळ चेहऱ्यावरून पुष्कळ वेळां मुलगा कीं मुलगी हें ओळखणें कठीण पडेल. इतर

अवयवांच्या बाबतींतहि प्रमाणाचा व परिमाणाचा फारसा फरक नसतो. पण मुग्धावस्थेंत स्त्रीच्या शरीराचें स्वरूप बदलावयास प्रारंभ होऊन त्यानंतर थोड्याशा काळांत तिला जी तारुण्यप्राप्ति होते तेव्हां तिच्या शरीराचें स्वरूप व प्रमाणें एकदम बदलून चेहऱ्याखेरीज तिच्या पूर्वस्वरूपाशीं फारच थोडें साम्य शिल्लक राहतें. शारीरिक फरकाबरोबरच तिच्या मनोवृत्तीमध्येंहि स्थित्यतर होतें आणि एकंदरींत तिचें व्यक्तित्वच बदलते असें म्हटलें पाहिजे. असें स्थित्यंतर घडवून आणण्यात निसर्गाचा विशेष हेतु असतो व त्याच्या सिध्यर्थ सर्वच प्रकारानीं निसर्ग स्त्रीला आमूलाग्र बदलून टाकीत असतो.

तारुण्यावस्थेंतील शरीरसौष्ठव हेंच स्त्रीचें महनीय वैभव. जीवनाच्या वसंतऋतूमध्यें शारीरिक व मानसिक सौदर्यानें स्फूर्तिदेवतेप्रमाणें चमकून ती स्वत:भोंवतीं उत्साहाचीं, आनंदाची व सौख्याचीं तेजोवलये निर्माण करीत असते. पार्थिव सौदर्याचे जे चार गुण-विशेष यापूर्वी सागितले त्याची समृद्धि याच वयामध्यें स्त्रीच्या ठिकाणीं पाहावयास सांपडते.

वेगवेगळ्या देशांच्या हवामानांतील वैशिष्ट्यांनुसार लोकांची उची व अंगकान्ति वेगवेगळी असलेली दिसते. तथापि ह्या कारणा-मुळें शरीराच्या प्रमाणबद्धतेमध्यें फरक पडतोच असें मात्र नाहीं. उंचीच्या प्रमाणांत अवयवांचीं मोजमापें असलीं तर प्रमाणबद्धतेचा गुण सहजच उपलब्ध होऊं शकतो. उत्क्रान्तितत्त्वाप्रमाणें, जास्तींत जास्त उत्क्रान्त झालेल्या मानव जातीमध्यें (race) प्रमाणबद्धता अधिक व म्हणून सौंदर्य देखील अधिक असतें असें मानलें जातें. ह्या विचारसरणींत तथ्यांश किती आहे व सौदर्याच्या शाश्वत




पृष्ठभागाची लयबद्ध रम्यता

णांच्या दृष्टीनें कोणती तरी एक जात जगांतील इतर जातींपेक्षा अधिक सपन्न असू शकेल किंवा नाहीं ह्या प्रश्नाचें उत्तर चटदिशीं देण्यासारखें नाहीं. उत्क्रान्तितत्त्वाप्रमाणें विचार केला असता अशी संभाव्यता मान्य करावयाला फारशी अडचण दिसत नाहीं. ज्याप्रमाणें बुद्धिमत्तेच्या बाबतींत एकादी जात सरासरीनें सर्वांत अग्रेसर असू शकेल, त्याचप्रमाणें सौदर्याच्या दृष्टीनें विचार केला असता एकादी जात इतर जातीहून अधिक समृद्ध असणें असंभवनीय नाहीं.

जगाच्या पाठीवर अस्तित्वात असलेल्या मानवजातींचें वर्गीकरण करण्याच्या किंवा मानवाच्या जाती ठरविण्याच्या वेगवेगळ्या पद्धती आहेत शरीराच्या बांध्याची प्रमाणें ध्यानात घेऊन, वेगवेगळ्या अवयवाची घडण व त्याच्यामधील वैशिष्ट्यें पाहून त्याच्या अनुरोधानें जाती ठरविता येतात. त्वचेच्या वर्णावरून जाती ठरविण्याची दुसरी पद्धत आहे. तिसरी पद्धत म्हणजे केसाचा रंग व लांब–सडकपणा, किंवा वळणदारपणा (curly or wavy) अथवा, लोंकरीसारखा राठपणा या वैशिष्ट्याच्या अनुरोधानें जाती ठरविण्यात येतात. ह्या तीन्ही पद्धतीपैकीं कोणतीही एक पद्धत स्वयंपूर्ण नसून जातीचा विचार पूर्णत्वानें करावयाचा तर त्या सर्वांचाही उपयोग थोडयाफार प्रमाणात करावा लागेल. तथापि सौदर्याचें खरें अधिष्ठान प्रमाणबद्धतेवर असल्यामुळें वरील पद्धतींपकीं पहिली पद्धत आपल्याला प्रामुख्यानें उपयोगांत आणावी लागेल. महाराष्ट्रीय समाजापुरतें बोलावयाचें झालें तरी आपली जात कोणती आहे हें पाहण्यापेक्षा शारीरिक घडणीच्या दृष्टीनें तिचीं वैशिष्ट्यें काय आहेत हें पाहणेंच अधिक महत्त्वाचें आहे.

या दृष्टीने विचार करता पाश्चात्य चित्रकार आणि शिल्पकार यानीं संमत केलेली प्रमाणबध्द शरिराची कल्पना-भौगोलिक परिस्थिति व आनुवंशिक वैशिष्टयें यामुळें उत्पन्न होणारा फरक वगळल्यास- आपल्यातील सुसस्कृत किंवा सुधारलेल्या जातीमधील स्त्रियाना बऱ्याच प्रमाणात लागू पडण्यासारखी आहे. यामुळें, पाश्चात्य कल्पना आणि आपल्याकडील वस्तुस्थिती या दोन्ही गोष्टी ध्यानीं ठेवून, आपल्या समाजाच्या दृष्टीने, सौदर्याच्या चिकित्सेमध्यें ज्याचा उपयोग होईल अशा काही गोष्टी पुढें माडीत आहे.

शरिराच्या प्रमाणाविषयीं विचार करताना इच, सेंटिमिटर, अंगुळें इत्यादि नेहमीच्या मोजमापाच्या परिमाणाऐवजी शरिराचाच काणता तरी एक भाग परिमाण (unit of measurement) म्हणून घेऊन तदनुरोधाने सबध शरिराचीं किंवा इतर अवयवाची मोज-मापें घेणें हे अधिक सोयीचें पडते. हनुवटीपासून डोक्याच्या कवटीच्या अत्युच्च भागापर्यंतची डोक्याची उची हे परिमाण धरून त्याच्या साह्याने शरिराच्या इतर भागाचीं मोजमापे घेण्याची पद्धत सर्वसंमत ठरलेली आहे. त्याच पद्धतीचा आपल्याला देखील उपयोग करून घेता येण्याजोगा आहे.

पाश्चात्त्य चित्रकाराच्या व शिल्पकाराच्या मत सामान्यतः प्रमाण-बद्ध शरीराची उंची, डोक्यासह, डोक्याच्या सातपटीपासून आठ-पटीपर्यंत असते. काहीं व्यक्तींच्या ठिकाणी सातपटीचें प्रमाण आढळतें तर काहींच्यामध्यें साडेसातपटीचें प्रमाण सापडतें. ग्रीक शिल्पाचा अत्युत्कृष्ट नमुना म्हणून गणल्या गेलेल्या व्हीनसच्या पुतळ्यामध्यें आठपटीचें प्रमाण पाहायला सापडते. पण साधारणपणें साडेसातपटीचें प्रमाण सर्वसामान्य असें मानण्यांत येतें.

साडेसातपटीच्या प्रमाणाच्या, पाश्चात्य कल्पनेच्या अनुरोधानें



ही आकृती काढलेली आहे. डोक्याच्या उंचीच्या सुमारे दुप्पट रुंदी व साडेसात पट उंची असलेल्या काटकोनी चौकोनात स्त्रीची सपूर्ण आकृती काढलेली असून तीवरून शरिराच्या वेगवेगळ्या अवयवाच्या लांबी-रुंदीची साधारण कल्पना येण्यासारखी आहे. यात दाखविलेलीं प्रमाणें ही सर्वसामान्य अशा स्त्रीशरिरामध्यें उपलब्ध होणाऱ्या प्रमाणावर आधारलेली आहेत व निरनिराळ्या अवयवाची परस्पराच्या पासूनची अतरें आणि उंचीच्या व रुदीच्या दृष्टीनें त्याचे स्थान (Position) याविषयींदेखील ह्या चित्रावरून थोडीफार कल्पना येण्यासारखी आहे. आठपटीच्या प्रमाणात असणारा स्त्रीदेह ह्याच्यापेक्षा लांबट आणि अरुद दिसेल तर सातपटीचें प्रमाण साधणारें शरीर यापेक्षा अधिक जाड किंवा रुद दिसेल.

उंचीच्या प्रमाणाची वर दिलेली कल्पना महाराष्ट्रीय स्त्रियाच्या बाबतींत कितीशी लागू पडते हे पाहण्यासाठीं, साधारणपणे बाधेसूद दिसणाऱ्या, फार उंच नाहींत व फार ठेंगण्याहि नाहीत, अशा कांहीं स्त्रियाच्या शरिरांचीं मोजमापें घेतलीं, ती खाली दिली आहेत.

| | डोक्याची उची | एकंदर उची |
|---|---|---|
| (१)… | … ८ इंच … | … ६२॥ इंच |
| (२)… | … ७॥ ,, … | … ६४ ,, |

| | डोक्याची उंची | एकंदर उंची |
|---|---|---|
| (३) ... | ... ९॥ ,, | .. ... ६३॥। ,, |
| (४) ... | ... ८ ,, | ... ... ६१॥ ,, |
| (५) ... | ... ९॥ ,, | ... ... ६२। ,, |
| (६) ... | ... ९ ,, | . ... ६१। ,, |
| (७) ... | ... ९॥ ,, | .. ... ६० ,, |
| (८) ... | ... ९ ,, | . . ६० ,, |
| (९) | ... ९। ,, | .. ६१॥ ,, |
| (१०) ... | ... ९ ,, | ... .. ६१ ,, |
| (११) ... | ... ८॥। ,, | ... ... ६२ ,, |
| | ९७। | ६७९॥। |

वरील आंकड्यावरून सरासरी काढल्यास हे प्रमाण सातपटीचें पडतें असें दिसून येईल. अर्थात्, सामन्यापेक्षा निश्चितपणे ठेगण्या किंवा प्रमाणाबाहेर उंच अशा स्त्रियांच्या बाबतींन हें प्रमाण लागू पडणार नाही. उचापेक्षा ठेगण्या स्त्रियाचेच प्रमाण आपल्याकडे जास्त आहे. पण आपल्याला विचार करावयाचा तो त्यातल्यात्यात बाधेसूद दिसणाऱ्याच्या प्रमाणांवरूनच करावयाचा आहे. अथात्, हें सातपटीचें प्रमाण महाराष्ट्रीय स्त्रियाचे सरासरी प्रमाण नसून त्याच्यामधील प्रमाणबद्ध देह असणाऱ्याचें आहे.

याच रीतीनें शरिराच्या वेगवेगळया ठिकाणच्या रुंदीची प्रमाणें काढण्याचा प्रयत्न करताना, निकोप प्रकृतीच्या, अठरा ते पंचवीस वर्षे वयाच्या व विकृति किंवा अनेक वेळच्या प्रसूती इत्यादि कारणामुळें ज्यांच्या शरिरावर परिणाम झालेला नाही अशा काही स्त्रियाचीं मापें घेतलीं. त्यावरून सरासरी काढली ती पुढीलप्रमाणें मिळाली.

| | | | |
|---|---|---|---|
| (१) | खाद्याकडील रुंदी ... ... ... ... ...... | १४॥। | इंच |
| (२) | कमरेकडील ,, ... ... ... ... ...... | ८॥ | ,, |
| (३) | कटिबंधाची सर्वात जास्त रुंदी ... ...... | १३॥ | ,, |
| (४) | दोन्ही पायाच्या पोटऱ्याची एकत्र रुंदी ...... | ८। | ,, |

ह्या चार मोजमापाच्या जोडीला डोक्याची उंची ९ इंच आणि



एकंदर उंची ६३ इंच एवढीं मापें धरून व निरनिराळ्या अवयवाची उंचीच्या दृष्टीनें ठेवण ध्यानीं घेऊन महाराष्ट्रीय स्त्रीची प्रातिनिधिक आकृती काढता येईल. कोणत्याहि जातीची प्रातिनिधिक आकृती या पद्धतीनें काढता येईल व अशा वेगवेगळ्या जातींच्या प्रातिनिधिक आकृतींवरून सौंदर्याच्या दृष्टीनें जातींचा अनुक्रमहि लावता येईल. तथापि तसा प्रयत्न करणे हें ह्या लहानशा पुस्तकाच्या कक्षेबाहेरचें असल्यामुळें त्या पद्धतीचा थोडक्यात उल्लेख केला आहे.

स्त्रीदेहाच्या अस्थिरचनेच्या ह्या चित्रावरून साधारणपणें प्रमाणाची कल्पना येण्यासारखी आहे. हातापायांची लांबी, एकंदर शरिराच्या लांबीरुंदीचें प्रमाण इत्यादि गोष्टी-

विषयीं देखील सामान्य कल्पना येण्यासारखी आहे. मात्र निश्चित मोजमापे घ्यावयाचीं तर देहाला कोणत्याही प्रकारें वाक, मुरड किंवा कलतेपणा न देता अगदीं सरळ उभ्या स्थितीतच तीं घेतलीं पाहिजेत. अशा पद्धतीने साधारणतः प्रमाणबद्ध असणाऱ्या स्त्री-देहाचीं मोजमापे घेतलीं तर ठोकळ मानानें शरिराच्या एकदर उचीशीं निरनिराळ्या अवयवाची प्रमाणे खाली दाखविल्याप्रमाणें आढळतात.

(१) कटिबंधाच्या पुढल्या हाडाचा सांधा उंचीच्या दृष्टीनें शरिराच्या मध्यावर येतो

(२) कमरेपासून (सर्वांत अरुंद भागाच्या ठिकाणापासून) खाला पायाच्या तळव्यापर्यंतचे अतर हें डोक्याच्या अत्युच्च भागापासून कमरेपर्यंतच्या अंतराच्या दुप्पट असतें.

(३) शरिराच्या मध्यापासून खाली गुडघ्यापर्यंतचें अंतर हें गुढग्याप सून खाली पायाच्या तळव्यापर्यंतच्या अंतराइतकें (थोडेसें कमी) असतें.

(४) कटिबंधाच्या सर्वांत रुंद भागाचें (नितंबाच्या ठिकाणचें) एकंदर उंचीशीं साधारणतः २:९ हें प्रमाण पडतें.

(५) खांद्यापासून हाताच्या मधल्या बोटाच्या टोकापर्यंतचें अंतर शरिराच्या एकदर उंचीच्या सुमारें $\frac{४}{९}$ इतकें असतें.

(६) स्तनाच्या ठिकाणाकडून घेतलेली छातीची रुंदी एकंदर उंचीच्या सुमारें $\frac{१}{६}$ इतकी असते.

(७) कमरेची रुंदी व शरिराची उंची याचे प्रमाण सुमारें ५:३६ असें पडतें.

ब्रिजमनने आपल्या लाईफ ड्रॉइंग (Bridgman's Life Drawing) या पुस्तकात, मानवी देहाच्या चित्रीकरणाची एक अत्यंत सोपी रीत सांगितली आहे डोके, छातीचा भाग व कटिबंध हे तीन घन ठोकळे कल्पून, डोक्याच्या खालून निघून मानेंतून व कण्यांतून कटिबंधाच्या पाठीमागे माकडहाडाच्या ठिकाणी संपणाऱ्या अस्थिमलिकारूपी लवचिक तारेनें ते एकाखाली एक असे जोडलेले आहेत अशी मानवी देहाच्या रचनेची कल्पना केलेली आहे. शरीराचा समतोलपणा साधण्यासाठी हे तीन घन ठोकळे (solid blocks) पुढे-मागे, वर-खालीं किंवा उजवीकडे वा डावीकडे वळतात किंवा वाकतात. (मात्र कोणत्याही स्थितीमध्यें त्याच्या स्वरूपामध्यें घडणीच्या दृष्टीनें फरक पडूं शकत नाहीं.) छातीच्या विभागाला वर दोन बाजूंस हात जोडलेले असतात आणि कटि-



बंधाच्या घनाला, थोडेसे खालच्या बाजूस, बाहेर, पाय साधलेले असतात. समतोलपणा, गति व संगति या तीन गोष्टी लक्षात घेऊन त्या घनाच्या वेगवेगळ्या रचना करून मानवी देहाचीं वेगवेगळ्या स्थितींतील चित्रें कल्पनेने काढतां येतात.

स्थिति-वैचित्र्य व चैतन्य यांच्यामुळें देहाच्या ठिकाणीं विशेष आकर्षण उत्पन्न होत असतें. स्थिर आणि सरळ अशा स्थितीमध्यें एका प्रकारची एकसूरता (monotony) येऊन राहते. शरीराच्या वैचित्र्यपूर्ण किंवा गतिसूचक स्थितीमध्ये किंवा प्रत्यक्ष चैतन्यपूर्ण हालचालीमध्यें लालित्य आणि लयबद्धता निर्माण होत असतात. चैतन्य हा प्राणिमात्राचा नैसर्गिक गुणधर्म आहे आणि त्याचा अभाव असलेला देह व अचल पाषाणमूर्ती यांच्यामध्ये फारसा फरक नसतो. लयबद्धतेमध्यें (Rhythm) चित्ताकर्षक गति किंवा अशा गतीचा आभास याचा अंतर्भाव होतो. शरीराच्या गतिमान् किंवा गतिनिदर्षक अवयवाशीं अचल अवयवाचे उपागत्व (subordination) व त्याच वेळी समानतेचा (Symmetry) अप्रत्यक्षपणें होणारा आविष्कार यामुळें निर्माण होणाऱ्या दृश्य रम्यत्वाला चित्र-लेखनाच्या दृष्टीने लयबद्धता म्हणता येईल.

स्वराची वा स्वररचनेची गति व दीर्घत्व, अनुरूप अशा काल-खंडाच्या किंवा लयीच्या अनुरोधानें मर्यादित करून साधण्यात येणारें श्राव्य माधुर्य म्हणजेच संगीतातील लयबद्धता. त्याच-प्रमाणें आकृतीमधील लयबद्धता ही अस्पष्ट किंवा प्रकट अशा रेषाच्य दिशा किंवा लकबी व त्याना योग्य ठिकाणीं घातलेली स्थल-मर्यादा यावर अवलंबून असते लयबद्धतेच्या कल्पनेचे पृथक्करण करणें सोपें नाही. पण ती मनाला पटते व तिच्यापासून अत्यंत सुखकर असा अनुभव येतो एवढें निश्चितपणें म्हणता येईल.

शरीराच्या अवयवांमध्यें प्रमाणबद्धता नसूनहि केवळ डौलदार हालचालींमुळे आकर्षण उत्पन्न होऊं शकतें. लयबद्ध हालचालीं-




डोक्याची अस्थिरचना व दृश्यस्वरूप

ना किंवा गतीला प्रमाणबद्ध अवयवाची जोड मिळाली तर अशा संयोगाचें किंवा संगमाचें आकर्षण असामान्यच होईल.

वरील अल्पशा विवेचनावरून सौदर्यचिकित्सेच्या दृष्टीनें स्त्री-शरिराला सामान्यतः आवश्यक असलेल्या गुणधर्मांची कल्पना येईल. उत्क्रान्तिदृष्ट्या मागासलेल्या किंवा रानटी जातींमध्यें हे गुणविशेष अत्यंत अल्पशा प्रमाणात उपस्थित असतात असें साधार दाखवून देता येईल. अर्थात्, मानव जसजसा उत्क्रान्त होत जात आहे तसतसा तो अधिक सुंदरहि होत आहे असा उपसिद्धान्त कुणीं माडला तर त्यात विशेष आश्चर्य वाटण्याजोगें कांहीं नाही.

चेहरा हें मानवाच्या व्यक्तिमत्त्वाचें प्रत्ययस्थान आहे असें मानण्यात येतें. चेहऱ्याच्या सौदर्याला व्यवहारात सर्वांत अधिक महत्त्व मिळत असल्याकारणाने शरीराच्या ह्या मुख्य भागाचा थोड्या विस्ताराने विचार केला पाहिजे.





सुधारलेल्या जातींतील मनुष्याच्या डोक्याच्या अस्थिरचनेचीं हीं दोन चित्रें आहेत. डावीकडील चित्रावरून डोक्याच्या रुंदीची आणि डोळे, नाक, ओठ व हनुवटी याच्या स्थितीची कल्पना येईल

तर उजवीकडील चित्रावरून डोक्याची उंची व खोलपणा किंवा लांबी याचा बोध होईल. वानराचे डोकें ह्यापेक्षा अधिक चपटें, उंचीला कमी, हनुवटीपासून वरचे भाग पाठीमागें झुकत गेलेले आणि मेंदूला संरक्षण देणारा कवटीचा वरचा भाग अतिशय लहान (पर्यायानें मेंदूही लहानच) अशा रचनेचे असते. उंचीच्या मानानें त्याची रुंदी देखील अधिक असते. मनुष्याच्या रानटी (aboriginal races) जातींमध्यें, वरील चित्रातली स्थिती व वानराच्या डोक्याची रचना याच्या मधली स्थिती पाहावयाला सापडते. सुधारलेल्या जातीमध्येंहि डोक्याच्या घडणींमध्ये प्रमाणाचा थोडाफार फरक आढळतो. उदाहरणार्थ, मॉगोलियन जातींमध्ये (चिनी, तिबेटी, वगैरे) डोक्याच्या इतर रचनेमध्ये तेवढासा फरक नसला तरी चेहरा पुढून चपटा दिसतो व नाक, ओठ व डोळे याची ठेवण वेगळया पद्धतीची व कमी उठावदार असते. डोळ्याखालील हाड (Cheek-bone or Malar bone) अधिक प्रकट असतें. जगाच्या पाठीवर असणाऱ्या अनेक जातींच्या चेहऱ्याच्या (आणि शरीराच्या देखील) ठेवणीमधील फरकाचा खुलासा केवळ उत्क्रान्तितत्त्वाच्या अनुरोधानें करता येईल असे वाटत नाही. भौगोलिक परिस्थिती व जातीचीं वंशपरंपरागत अस्तित्वात असलेली वैशिष्ट्यें, याचा देखील विचार करावा लागेल. तथापि आपल्याला त्या प्रश्नाची चर्चा करणें शक्य नसल्याकारणानें ह्या गोष्टीचा केवळ उल्लेख करण्याशिवाय गत्यंतर नाहीं.

मागील आकृतीवरून असें दिसून येईल कीं उंची व रुंदी याचें प्रमाण ४:३ व ७:५ याच्या दरम्यान असतें. बाजूनें पाहिले असतां उंची व खोलपणा किंवा आडवी लांबी हीं जवळजवळ सारखीं असतात.



आतील अस्थिरचनेवर स्नायु, मास, त्वचा इत्यादींचें आच्छादन येऊन चेहऱ्याचें दृश्य स्वरूप निर्माण होतें. नाक, कान व ओठ हे अवयव विशिष्ट स्नायू व तत्सम इतर पदार्थ (cartilages) याच्या संयोगानें बनलेले असून त्याची व्यक्तिनिष्ठ वैशिष्ट्ये आतील अस्थिरचनेवर फारशी अवलंबून नसतात. त्वचेचे गुण व केसांची विपुलता व इतर गुण याचा देखील चेहऱ्याच्या एकदर स्वरूपावर बराच परिणाम होत असतो. चेहऱ्यावरील अवयवाच्या विषयी सर्वसामान्य नियम ठरविणें कठिण आहे. तथापि स्थूलमानानें असें सागता येईल की, कपाळाच्या वरच्या मर्यादेपासून भुवयांना जोडणाऱ्या आडव्या रेषेपर्यंतचे अंतर, तेथून नाकाच्या खालच्या टोंकापर्यंतचें किंवा पाया(base)पर्यंतचें अतर आणि नाकाच्या टोकापासून हनुवटीच्या खालच्या मर्यादेपर्यंतचें अंतर, ही तीन्ही अंतरें सारखीं असतात; आणि कपाळाच्या वर राहणारी डोक्याची उंची कपाळाच्या उंचीच्या निम्म्यापेक्षां थोडी कमीच असते. नाकाचा पाया व कानाचे खालचें टोंक किंवा पाळी एकाच आडव्या रेषेंत असतात (अर्थात्, चेहरा वर किंवा खालीं वळविलेला नसेल तेव्हांच). दोन्ही भुवया, दोन्ही डोळे, दोन्ही नाकपुड्या व ओठ

हे अवयव, कपाळाचा मध्यबिंदु व हनुवटीचा मध्यबिंदु ह्यांना जोडणाऱ्या उभ्या रेषेशीं काटकोनात असणाऱ्या आडव्या समांतर रेषांवर व ह्या मध्यरेषेपासून दोहींकडे सारख्या अंतरावर मर्यादित झालेले असतात. डोळ्याच्या रचनेमध्यें, नाकाच्या ठेवणीमध्यें व तोंडाच्या जिवणीच्या रुंदीमध्यें, तसेंच ओठाच्या जाडीमध्यें अनेक प्रकार पाहावयाला सापडतात.





कोंबड्याचें अंडें, निमुळतें टोंक खालीं करून उभें केलें तर जसें दिसेल तशी आकृती चेहऱ्याच्या मर्यादा निश्चित करण्यासाठीं काढण्याचा प्रघात आहे. अर्थात्, अशाप्रकारें काढलेल्या आकृतींत चेहऱ्याचीं प्रमाणे बरीचशी योग्य रीतीनें साधतां येतात; तथापि सर्वसामान्य आकृतीपुरतीच ही पद्धति उपयोगात आणतां येईल. कारण, प्रत्येक चेहऱ्याच्या ठेवणीचीं वैशिष्ट्यें आणि तपशील वेगळे असतात व यथावस्तु चित्र काढावयाचें असेल तर अशा गमकात्मक आकृतींचा उपयोग अल्प प्रमाणांतच होऊं शकतो.



उंची व लांबी सारखी व त्याच्या सुमारें पाऊणपट रुंदी अशा मोजमापाच्या ठोकळ्याच्या सारखी मनुष्याच्या डोक्याची रचना असते. बाजूच्या आकृतीवरून डोक्याचें हें सामान्य स्वरूप लक्षांत येईल.

मानवदेहाचें किंवा त्याच्या यथावस्तु चित्राचें अथवा शिल्पांचें निरीक्षण करून शरीराच्या सर्व अवयवाच्या प्रमाणाविषयी माहिती मिळविता येईल. अस्थीच्या सापळ्यावर स्नायूंची जी मांडणी केलेली असत तिच्यावरच मुख्यत: बाह्यस्वरूप अवलंबून असतें. शारीरशास्त्रावरील प्राथमिक पुस्तकामध्येही अशी माहिती दिलेली असते, तीवरून स्त्रीपुरुषाच्या देहाचें स्वरूप लक्षात येण्याजोगें आहे. पुरुषाच्या स्नायूमध्यें जो घट्टपणा व घोटीवपणा असतो त्यावर त्याचें सामर्थ्य अवलंबून असतें. स्वभावत: नाजुक असणाऱ्या स्त्रीदेहाचे स्नायू तितके घट्ट किंवा घोटीव नसतात व त्यामुळें स्त्रीदेह कोमल दिसतो. पीळदारपणा (angularity)च्या अभावीं त्याच्या ठिकाणी एक प्रकारचें नयनरम्य लालित्य प्रतात होत असतें. Streamlined bodyची कल्पना स्त्रीदेहाच्या ह्या वैशिष्ट्यावरच आधारलेली आहे.

ह्या पुस्तकात स्त्रीदेहाच्या वेगवेगळ्या अवयवाची निरनिराळ्या स्थितीतील जीं चित्रें दिलेलीं आहेत त्यावरून त्या त्या अवयवाची प्रमाणबद्ध घडण व त्याचे सौदर्यगुण ध्यानात येण्यास अल्पसें साह्य होईल. त्याविषयीची विस्तृत चर्चा स्थलाभावीं येथें करता येणें शक्य नाही.

कोणत्याहि वस्तूची हुबेहूब प्रतिकृती करणे हें काहीं कलावंताचे खरे कार्य नव्हे. चित्रकारानें किंवा शिल्पकाराने शारीरशास्त्राचा अभ्यास करावयाचा तो केवळ यथावस्तु प्रतिमा निर्माण करता यावी एवढयासाठी करावयाचा नसून शरीराच्या वेगवेगळ्या अवयवाच्या घडणीची वैशिष्ट्यें समजून घेऊन, त्या वैशिष्ट्याचें सौदर्यदृष्ट्या मूल्यमापन करून आणि ते सौदर्य कशामुळें निर्माण

होतें तें ओळखून प्रत्यक्ष उपलब्ध सौंदर्यापेक्षा, अभ्यास व कल्पना-शक्ति याच्या साह्यानें त्याहीपेक्षा उच्चतर प्रतीच्या सौंदर्याची निर्मिती करण्यासाठीं. यामुळे प्रत्यक्ष अनुभवास येणारीं शरीराची प्रमाणें थोडीफार बदलून चित्रकार किंवा शिल्पकार सौंदर्याचे आदर्श निर्माण करीत असतात, व त्या आदर्शापासून आपल्याला उच्च प्रतीचा सौंदर्यानुभव येऊं शकतो.

कोणत्याहि स्त्रीचे सर्व अवयव अगदीं प्रमाणबद्ध, निर्दोष व रेखीव असण्याचा संभव कमी. तथापि सुंदर स्त्रीची काल्पनिक प्रतिमा चितारताना चित्रकार तिचा प्रत्येक अवयव अगदीं रेखीव व प्रमाणबद्ध काढण्याचा प्रयत्न करीत असतो. यामुळें प्रत्यक्ष सुंदर स्त्री पाहून आपल्याला जा सौंदर्यानुभव किंवा जें समाधान होत नाहीं तो सौंदर्यानुभव किंवा ते समाधान चित्रकारानें निर्माण केलेल्या आदर्श सौंदर्याच्या दर्शनानें होऊ शकतें त्याप्रमाणेंच, पुष्कळशा चित्रामध्यें, स्त्रियाच्या कमरेपासून खालच्या भागाची लांबी, प्रत्यक्ष अनुभवाला येणाऱ्या प्रमाणापेक्षा थोडीशी अधिक दाखविण्यात येते आणि तीं चित्रें आपल्याला मनोहर वाटतात. सुंदर स्त्रियांचीं काल्पनिक चित्रे पाहिली तर त्यामध्यें गुढग्याखालील पायाची लांबीदेखील प्रत्यक्षात आढळणाऱ्या जास्तीत जास्त लांबी-पेक्षाहि थोडी अधिकच असलेली दिसून येईल प्रत्यक्ष उपलब्ध प्रमाणें मुद्दाम अव्हेरून निर्माण केलेल्या आदर्शामध्यें सौंदर्य वाढलेलें आपण पुष्कळ चित्रांमध्यें पाहतों. तथापि प्रमाणामध्यें केलेला हा फरक, अर्थातच, विशिष्ट मर्यादेपर्यंतच करता येतो व त्या मर्यादेचें उल्लंघन झाले तर सौंदर्याच्या वृद्धीऐवजीं विकृती आणि कुरूपताच निर्माण होऊं लागते.

पार्थिव सौंदर्याचें आदर्श स्वरूप हे देहामधील निसर्गनिर्मित (प्रमाणबद्धता, रेखीवपणा इत्यादि) सौंदर्यगुणाना लयबद्धतेच्या (Rhythm) तत्वाची जोड देऊन निर्माण केले जात असतें अर्थात्, निसर्गनिर्मित वस्तूवर संस्करण करून आदर्श सौंदर्यनिर्मिती करताना कलावत एका प्रकारें निसर्गापेक्षाहि उच्च अशा स्थानावर अधिष्ठित होत असतात. निसर्गाने अस्फुटपणें व अशत दाखविलेल्या सौदर्याच्या साह्याने, निर्दोष व संपूर्ण सौदर्याच्या शोधात, सौदर्याचे नवनवीन आदर्श ते जगापुढे ठेवीत असतात. यापूर्वी उद्धृत केलेले, कलावताच्या मनोभूमिकेविषयींचे कै. राजकवि तांबे याचे विचार याच तत्त्वाचे निदर्शक आहेत. तर्कशास्त्र किंवा नीतिशास्त्र याच्या प्रमाणेंच सौदर्यशास्त्रहि आदर्शात्मक किंवा Normative शास्त्र आहे. प्रत्यक्ष वस्तुस्थितीच्या अभ्यासाने, 'काय असावें' अशा ध्येयात्मक किंवा आदर्श परिस्थितीचा विचार करणें हेच अशा प्रकारच्या शास्त्राचें कार्यक्षेत्र असतें. नीतिशास्त्राला ज्याप्रमाणें मानसशास्त्राचा आधार आवश्यक असतो तद्वतच सौदर्यमीमासेला शारीरशास्त्रादि वास्तवस्थितीचें ज्ञान करून देणाऱ्या शास्त्राची उपेक्षा करून चालणार नाहीं.

वरील गोष्ट ध्यानात घेतली असता, प्रत्यक्ष अस्तित्वात असलेल्या स्त्रीदेहाच्या रचनेचीं गमकात्मक स्वरूपे चित्रकार किंवा शिल्पकार का कल्पितात व त्याच्या अनुरोधानें स्त्रीदेहाचें कलात्मक स्वरूप कसें निर्माण करतात, याचा उलगडा होण्यासारखा आहे. तथापि, यापूर्वी उल्लेख केल्याप्रमाणें, कलावंताचें या बाबतींतील स्वातंत्र्य अनियंत्रित असता कामा नये. त्याला शारीरशास्त्राचे दिग्दर्शक, व नियंत्रक बंधन घालणें अवश्य आहे हें ध्यानात ठेविलें पाहिजे.

शरीराच्या वेगवेगळ्या अवयवांच्या सौदर्यगुणांचा विचार करावयाचा तो त्यांचीं शारीरशास्त्रीय वैशिष्ट्यें, व चित्रकार आणि शिल्पकार यांनी कल्पिलेलीं कलात्मक स्वरूपें ह्या दोहोंचा समन्वय करून केला पाहिजे. तथापि ही गोष्ट सामान्य लोकाना सहज साधण्यासारखी नाहीं. प्रत्येक अवयवाचीं वैशिष्ट्ये व कलावंतानीं मान्य केलेलीं त्याचीं आदर्शात्मक स्वरूपें यांची सविस्तर चर्चा करणें येथें शक्य नसल्याकारणानें त्या त्या अवयवाची, वरील दोन्ही गोष्टींचीं निदर्शक अशी, काही चित्रे दिली आहेत. याविषयींची अधिक माहिती पाहिजे असल्यास, ज्या आधारग्रंथाची सूची पुस्तकाच्या शेवटी दिली आहे त्या ग्रंथावरून वाचकाना मिळविता येईल.

# वेशभूषा

देहाच्या सौन्दर्याची चिकित्सा करताना त्याची अनावृत स्थितीच प्रामुख्यानें ध्यानात घ्यावयाची असली तरी सामाजिक जीवनात अनेकविध कारणामुळें आवश्यक होऊन बसलेल्या वस्त्रालंकारादि विविध गोष्टी मानवाचें स्वरूप अनेक प्रकारानीं निश्चित करीत असतात ही गोष्ट काही दृष्टीआड करता येणार नाही. कोणत्याहि व्यक्तीविषयी आपल्या मनात विचार येतात तेव्हा त्या व्यक्तीला सामान्यतः ज्या प्रकारच्या पेहेरावामध्यें अथवा वेशभूषेमध्यें पाहण्याची संवय असते त्याच स्वरूपात ती व्यक्ती आपल्या डोळ्यापुढे उभी राहते. व्यवहारात, व्यक्तीच्या नेहमींच्या पेक्षा वेगळ्या वेशभूषेमधील स्वरूपहि आपल्याला तितकसें निश्चितपणें केवळ कल्पनेने अनुभविता येत नाही. सामाजिक जीवनापुरते व्यक्तीचे जड अस्तित्व तिच्या कोणत्या ना कोणत्या तरी आच्छादित व विभूषित स्वरूपापासून अभिन्न असेंच असतें.

वस्त्रें, अलंकार व सौदर्यप्रसाधन ह्या गोष्टी मानवनिर्मित असून त्याच्या योजनेमागे काही विशिष्ट हेतु असतात. त्याच्यापासून अपेक्षिलेला लाभ खरोखरीचा असेल किंवा केवळ काल्पनिक देखील असूं शकेल. तथापि काही तरी उद्दिष्ट असल्याखेरीज मनुष्य कोणतीहि गोष्ट करीत नाही.

## वस्त्रें

शरीररक्षणाच्या दृष्टीने आच्छादनाची अवश्यकता अगदीं वन्य स्थितींत देखील भासणें साहजिक आहे. रानटी टोळ्या झुधारून

त्याचें समाजामध्यें रूपान्तर होऊं लागलें तेव्हां लज्जारक्षणाच्या दृष्टीनें शरीराच्या विशिष्ट भागापुरतें तरी आच्छादन अवश्य वाटूं लागलें. याच वेळीं अवश्यकता आणि सभ्यता या दोन्ही गोष्टींचा समन्वय होऊन वस्त्रप्रावरणाला वेगवेगळी पण थोडींफार निश्चित स्वरूपें प्राप्त होऊ लागली. समाजाच्या प्राथमिक अवस्थेत तरी ह्या दोन उद्दिष्टांशिवाय आच्छादनाला किंवा वस्त्रांना तिसरे साध्य नव्हतें असेंच म्हणावें लागेल. कारण, शरीराला भूषविण्यासाठीं किंवा त्यात आकर्षकपणा अथवा शोभा आणण्यासाठी वेगवेगळ्या तऱ्हाचे अलकार, पल्लव, फुले, पक्ष्याची चित्रविचित्र पिसें, व प्रत्यक्ष शरीरावर गोदणें, इत्यादि साधने अगदी नग्न स्थितीत वावरणाऱ्या रानटी मानवामध्येंहि प्रचलित होतीं. देह भूषविण्याची प्रवृत्ती रानटी स्थितीत होती तशीच सुधारलेल्या स्थितीतहि आहे फक्त साधने व पद्धती यांच्यामध्यें फरक पडत गेला एवढेच म्हणता येईल.

मानवाची सुधारणा होऊं लागली तसतशी त्याची सौन्दर्यदृष्टी बदलत चालली, व आवश्यकता आणि सभ्यता याच्या जोडीला शरीराला भूषविण्याची कल्पना देखील वस्त्रप्रावरणाच्या उद्दिष्टामध्यें समाविष्ट झाली. हे नवे उद्दिष्ट साधण्याच्या दृष्टीनें वस्त्राच्या प्रकारामध्यें त्यानंतर झपाट्यानें फरक पडूं लागले.

भौगोलिक परिस्थितीमुळें अवश्य ठरलेल्या आच्छादनाला कार्यक्षमतेची मुरड बसून दोन्ही गरजा भागविण्याचा गुण म्हणजे सोयिस्करपणा हे पोशाखाचें एक आवश्यक अंग ठरलें. लज्जारक्षणाच्या जोडीला धार्मिक, राष्ट्रीय किंवा राजकीय इत्यादि अनेकविध नियामक तत्त्वें येऊन सभ्यतेची अतिविस्तृत व अनेक उपागांनीं



सकच्छ नेसण्याच्या महाराष्ट्रीय पद्धतीने शरीराच्या नैसर्गिक ठेवणीला बाध न येता वस्त्राला पडणाऱ्या सुरकुत्या शरीराच्या मर्यादारेषाशीं कशी संगति साधतात हे ह्या चित्रामध्ये दिसून येईल.

भरलेली नवी कल्पना मनुष्याच्या वस्त्रप्रावरणाचें किंवा पोशाखाचें दुसरें महत्त्वाचें अंग होऊन बसलें. ह्या दोहोंच्या जोडीला सौन्दर्य-प्रसाधनाचे तिसरें नवे अंग आपल्या नावीन्याच्या जोरावर सध्या शिरजोर होऊ पाहात आहे. ह्या तिसऱ्या अंगाचाच आपल्याला विचार करावयाचा असला तरी त्याचें महत्त्व प्रमाणाबाहेर वाढूं दिल्यानें पहिल्या दोन अंगाच्या वास्तविक महत्त्वाला बाध येऊन एकदरीत समाजाचें अनहितच होण्याचा अधिक संभव आहे, ही गोष्ट ध्यानात ठेविली पाहिजे. अर्थात्, पोशाखामागील पहिल्या दोन्ही उद्दिष्टाचे महत्त्व योग्य प्रमाणात राखून सौन्दर्याच्या दृष्टीने काय साधता येईल याचाच विचार मी करणार आहे.

स्त्रीदेहाचे सौन्दर्य कोणकोणत्या गोष्टीवर अवलंबून असतें याचें अल्पसें दिग्दर्शन यापूर्वीं केलेच आहे. वस्त्रप्रावरणामुळें देहाच्या नैसर्गिक सौन्दर्याला बाध न येता उलट जर त्यात भर टाकावयाची असेल तर पहिल्याने वस्त्राच्छादनामुळे देहाच्या नैसर्गिक आकाराला कोणत्याहि रीतीची विकृति येणार नाही ह्याविषयी काळजी घेतली पाहिजे. स्त्रीदेहाची नयनरम्यता ही त्याच्या लालित्यपूर्ण वळणदार-पणावर अवलंबून असते. वस्त्र अंगाबरोबर राहिले तरच शरीराचा बांधा व प्रवाही (flowing) अशा मर्यादारेषा (outlines) योग्य प्रमाणात प्रकट होऊ शकतील. पण वस्त्र जर अंगाबरोबर राहणारें नसेल तर मूळ देहाच्या ठेवणीचीं वैशिष्टये अदृश्य होऊन केवळ वस्त्राच्या रचनेप्रमाणें अगदीं वेगळ्या प्रकारचा नवाच आकार निर्माण होईल.

स्त्रीशरीराच्या अवयवांच्या ज्या सुरम्य अशा नैसर्गिक मर्यादा असतात त्या झांकल्या गेल्यानें देहाचें नैसर्गिक सौंदर्य प्रकट

व्हावयाला मोठीच अडचण निर्माण होते. शिवलेल्या कपड्यांनीं अशा मर्यादांचा प्रकटपणा साधणे बरेंच कठिण पडतें व हें साधावयाचें असेल तर कपडयाचें बेतणें व शिवणें ह्या दोन्ही गोष्टी बऱ्याच गुंतागुंतीच्या व कष्टाच्या होऊन राहतात. याच्या उलट आच्छादनाच्या कामीं एकाच लांब अशा वस्त्राचा कौशल्यानें उपयोग केला तर त्या वस्त्राला अवयवाच्या ठेवणीप्रमाणें ज्या सुरकुत्या किंवा घडया साहजिकपणेंच पडतात त्याची साथ किंवा जोड मिळून स्वरूपाची रम्यता अधिक खुलून दिसते. शरीराच्या अवयवाना धरून राहण्याच्या, व त्यावर साहजिकपणें पडणाऱ्या सुरकुत्यानी अवयवाच्या मर्यादाशी रम्य अशी संगति साधण्याच्या गुणाच्या दृष्टीने सकच्छ नेसण्याची महाराष्ट्रीय पद्धति बऱ्याच वरच्या प्रतीची ठरेल.

विकच्छ किंवा 'गोल' नेसणें कोणत्याही पद्धतीचे असले तरी त्या पद्धतीमध्यें वस्त्र शरीराला धरून राहते (पदाराखेरीज) तें फक्त नितंबाभोंवती, व त्यामुळें तेवढ्याच भागाला प्रकटपणा येतो केवळ नितंबानाच प्रकटपणा आणल्या गेल्याकारणानें कोणाचेंहि लक्ष फक्त त्याच ठिकाणी वेधलें जातें व ही गोष्ट कांही विशेप इष्ट आहे असें वाटत नाही. शिवाय नितंबांची ठेवण देखील प्रमाणबद्ध असेल तर ठीक, नाहीतर तो एक दृष्टीवर अत्याचार आहे असेंच म्हणण्याची पाळी येते. नितंबांना प्रकटपणा येण्याचें कारण असे की, वस्त्राच्या वेष्टनाची दिशा आडवी असल्यामुळें त्याचा परिणाम नितंबांची रुंदी वाढून दिसण्याचाच होतो. खालील वस्त्रही आडवेंच वेष्टिलें गेल्याकारणानें तें पायांना धरून राहूं शकत नाहीं व त्यामुळें पायांच्या मर्यादा व सौदर्य लक्ष वेधून घेऊं शकत

नाहींत. या कारणामुळें सामान्यपणें एकंदर दृश्य पिंपासारखें दिसूं लागतें. गोल नेसणें पुरेशा उंच व प्रमाणांतच मांसलपणा असणाऱ्या स्त्रियांनाच फक्त शोभून दिसतें. याचें कारण असें कीं, वस्त्राची दिशा आडवी असली तरी देहाची उंची पुरेशी असल्यामुळें वस्त्राला ठिकठिकाणीं उभ्या सुरकुत्या पडतात व शरीराच्या उभ्या मर्यादांशी त्याचे रम्यसे मीलन किंवा संयोग होतो. तसेंच शरीराची जाडी प्रमाणशीर असल्याकारणानें वस्त्र साधारणपणें अंगाबरोबर राहतें व त्यामुळें अवयवाच्या नैसर्गिक वळणदारपणाला बाध न येतां चागला उठावदारपणा येतो. पण प्रमाणाबाहेर लठ्ठ असणाऱ्या स्त्रिया गोल नेसणामुळें अधिकच बेढब दिसतात व अत्यंत कृश स्त्रिया फडक्यात गुंडाळलेल्या काठीसारख्या विचित्र दिसतात. सकच्छ नेसणे हें बहुतकरून सौंदर्य वाढवून दाखवितें; निदान देहाचे दोष तरी अवास्तव रीतीनें प्रकट करीत नाहीं.

अखंड किंवा शिलाई न केलेल्या आच्छादक वस्त्रांविषयीं वर ज्या गोष्टी सांगितल्या त्याच्या जोडीला कमरेच्या वरील भागाचें आच्छादन करण्यासाठीं जो पदर किंवा त्या वस्त्राचा भाग उपयोगात आणला जातो त्याचा थोडासा विचार केला पाहिजे. पदरानें पोट, व स्तनांमुळें प्रकटपणा आलेला वक्षभाग, हीं दोन्ही झांकलीं जाऊन खाद्यावरून मागें सुटणाऱ्या पदराच्या शेवामुळें, इच्छा असल्यास, पाठीलाही आच्छादन मिळतें किंवा तो मोकळाच सोडल्यास त्याला पडणाऱ्या उभ्या घड्यांमुळें किंवा सुरकुत्यांमुळें शरिराच्या रुंदीचा प्रकटपणा कमी केला जातो.

वस्त्राला उभ्या किंवा आडव्या पट्टया (strips) किंवा काड्या असल्यास त्यांमुळें एक प्रकारचा दृष्टिविभ्रम उत्पन्न होऊन प्रत्य-

क्षात असलेल्या उंची-रुंदीच्या प्रमाणापेक्षा वेगळ्या प्रमाणांचा आभास उत्पन्न होतो. वस्त्र नेसल्यानंतर त्यावरील पट्ट्या उभ्या किंवा शरीराच्या उंचीला समांतर राहत असतील तर शरीराची उंची वाढून दिसते व पट्ट्या उंचीशीं काटकोनात किंवा आडव्या दिसत असल्या तर देहाची रुंदी आहे त्यापेक्षां अधिक असल्याचा भास उत्पन्न होतो. याचे कारण असें की, आपली दृष्टी साहजिकपणें त्या पट्ट्यांच्या दिशेनें जाते व त्याच दिशेचें प्रमाण वाढून दिसते. वस्त्राला पट्ट्या नसल्या तरी त्याचे कांठ किंवा किनारी जर स्पष्ट दिसणारी किंवा विशेष प्रकट असली तरी देखील अशाच प्रकारचा आभास उत्पन्न होतो. पट्ट्याचीं किंवा प्रकट काठाचीं वस्त्रें नेसावयाचीं तर आपल्या स्वरूपावर अशा आभासाचा प्रतिकूल परिणाम होणार नाहीं अशी दक्षता स्त्रियानीं घेणें अवश्य आहे.

लज्जारक्षणाच्या दृष्टीनें कटिबंधाच्या नंतर दुसरा महत्त्वाचा भाग म्हणजे वक्ष हा होय स्त्रीचे स्तन हे उद्दीपक अवयवा- (erogenous zones) पैकीं असल्याकारणानें ते आच्छादून टाकण्याची गरज सुधारलेल्या समाजात भासणें साहजिक आहे. तथापि स्त्रीदेहाच्या रम्यत्वाच्या दृष्टीनें स्तनाच्या वळणदार मर्यादा अतिशय महत्त्वाच्या आहेत म्हणून, स्तनांच्या आकारबद्धतेला (shapeliness) बाध न येईल अशा रीतींनेंच पण सभ्यतेची मर्यादा संभाळून आच्छादक वस्त्राची योजना झाली पाहिजे. पुरातन कालीं स्तनांवरून अरुंद वस्त्राची आडवी पट्टी घेऊन त्या पट्टीच्या दोन्ही टोकांची पाठीमागें गाठ मारण्याची पद्धत अस्तित्वांत होती. कंचुकी किंवा चोळी ही ह्यापुढील अवस्था म्हटली पाहिजे. चोळीनें स्तनभाग झाकला गेला तरी पोटाचा भाग उघडा राहतो व तो



ह्या दोन आकृतींपैकीं एक कागदाच्या तुकड्याने झाकून टाका. दिसत असलेल्या आकृतीची ठेवण ध्यानी घ्या. नतर पहिली आकृति झाकून दुसरी पाहा. तिची ठेवण ध्यानी घ्या. वास्तविक दोन्ही आकृती एकाच मोजमापाच्या असताना वस्त्राला आडव्या पट्ट्या असलेली आकृति अधिक रुंद असल्याचा भास होईल, तर उभ्या पट्ट्याचे वस्त्र असलेली अधिक उंच आहे असे वाटेल.

आच्छादून टाकण्यासाठीं पोलकीं व अलीकडील ब्लाऊझ निर्माण झालीं. चोळीपासून शिवणकामाची जरुरी निर्माण झाली व शिवलेल्या एकाच कपड्यानें वक्षभागाबरोबरच हाताचा कांहीं भाग आच्छादण्याचीहि शक्यता व इष्टता उत्पन्न झाली. कोपरापर्यंत लांब हाताच्या चोळया, मनगटापर्यंत हात असणारीं बडीवजा पोलकी, कोपराच्यावर हात असणाऱ्या चोळया, पोलकीं व ब्लाऊझ वगैरे सर्व प्रकार हे वेगवेगळ्या अभिरुचींचे निदर्शक आहेत.

बिनबाह्यांच्या कपड्याविषयी दोन शब्द लिहिणें अवश्य वाटते. ती पद्धत, आणि ओठ, तोंड रंगविण्याची सौंदर्यप्रसाधना हीं जुळी भावंडें आहेत. बाहूंच्या रेखीवपणाचें प्रदर्शन करण्याची कल्पना त्या पद्धतीच्या मुळाशी नसेल असे नाही पण अगदीं किरकोळ किंवा प्रमाणाबाहेर लठ्ठ बाहू असणाऱ्या स्त्रिया देखील हा 'शौक' करतांना आढळतात. तेव्हा मूळ उद्देशाचें महत्त्व राहिलेच कुठें ? शिवाय काखेंतील 'अवास्तव' केसाची नियमितपणें विल्हेवाट लावण्याचा नवा उद्योग उपस्थित झालाच. त्याचे समर्थन करण्यासाठीं खरे किंवा काल्पनिक लाभ शोधून काढण्याचें कार्यहि, अर्थातच, कांहीं बुद्धिवान् लेखकाना करण्याची वेळ आली. पाश्चात्य वेशभूषेच्या अधानुकरणाची प्रवृत्ती या नव्या पद्धतीच्या मागें नाहीं असें क्षणभर मानले तर ह्याचें औचित्य काय हें पाहणें अधिकच महत्त्वाचें ठरतें. त्या दृष्टीनें पाहूं गेलें असता ह्या प्रथेमागील एक प्रच्छन्न हेतु थोड्याशा विचारान्तीं उघडकीस येतो. बाहूंना व खाद्याजवळील वळणदार भागाला सौंदर्याच्या स्पष्ट गुणापेक्षां वैषयिक (erogenous) प्रकारचा, अधिक प्रबल पण प्रच्छन्न असा, गुणविशेष आहे. अशाच प्रकारची पण त्याहींपेक्षा बलवत्तर अशी

अन्वर्थकता उघड्या पडलेल्या कांखांना आहे. सर्वांत समजून येण्याला कठीण असा, पण सर्वांत महत्त्वाचा उद्देश म्हणजे अनाच्छादित बाहूंच्या उभ्या मर्यादा, आणि वक्षभागाला आच्छादणाऱ्या कपड्याशीं जवळजवळ निश्चितपणें साधण्यात येणारी अंगकान्तीची रंगभिन्नता या दोहोंमुळें कुणाचेंही लक्ष नेमकें स्तनांच्याकडे जातें. ह्या गोष्टीच्या युक्तायुक्ततेविषयीं लिहिण्याचें कारण नाहीं. तथापि खरा प्रकार मात्र बराचसा असा आहे. बाह्याच्या कपड्यामुळें हा हेतु साध्य होणें जरा कठीण पडतें. कारण, बाह्यांना पडणाऱ्या सुरकुत्याची दिशा आडवी, व छातीवरील आच्छादक कपड्याला, कुशींकडून स्तनाच्या बाजूला निसर्गतः पडत जाणाऱ्या वळ्या किंवा घड्याही स्तनाग्रांकडे मिळत जाणाऱ्या आडव्या, यामुळें बाह्या व अंगाचा कपडा याच्यामध्ये एका प्रकारचा अखंडपणा साधतो. त्यामुळें स्तनाना (अपेक्षिलेलें) प्राधान्य किंवा प्रकटपणा येत नाहीं.

कोणत्याही वस्तूकडे लोकाचे लक्ष वेधावयाचें असेल तर ती लपविण्याचा अल्पसा प्रयत्न उघडपणे केला म्हणजे काम भागतें. अगदीं तलम कापडाचा अंगातील कपडा- ब्लाउज किंवा त्याचा कोणताही प्रकार आणि त्याच्या आत, मुख्यतः स्तन झाकण्याच्या मिषानें वापरण्यात येणारी, बाहेरून सहजपणें अगदी स्पष्ट दिसणाऱ्या रगाच्या कापडाची चोळी, बॉडी वगैरे, हीं वर उल्लेखिलेल्या कुशल योजनेची प्रात्यक्षिकें आहेत. चड्ड्याच्या बाबतीतही तेंच तंत्र पाहावयास मिळतें. लज्जारक्षण हाच जर आतल्या कपड्यांचा खरा उद्देश असेल तर ज्या रगाचा वरचा कपडा असेल त्याच रंगाचें पण जरा जाड किंवा अ-पारदर्शक कापड आतल्या कपड्यांसाठी वापरले म्हणजे तो हेतु सहजपणें साध्य होईल.

अखंड आच्छादक वस्त्रें व शिवून तयार केलेले कपडे याच्या सौन्दर्यगुणाच्या दृष्टीनें महत्त्वाचे कांहीं मुद्दे वर उल्लेखिले आहेत. शरीराची ठेवण व कपड्याची योजना आणि रचना यांच्यामध्यें विरोधापेक्षा संगति असणें अवश्य आहे व दृष्टिविभ्रम उत्पन्न करणाऱ्या गोष्टी ध्यानात ठेवून त्यांच्यापासून सौन्दर्यहानि होऊं न देता शक्य तर लाभच करून घेतला पाहिजे.

## अलंकार

सौन्दर्यसाधनाचा एकच मुख्य उद्देश अलंकाराच्या मागें असावा आपल्या वैभवाचें किंवा श्रीमंतीचें प्रदर्शन करण्याचा जो अप्रत्यक्ष हेतु अलंकाराच्या मागें होता (आणि आजहि थोड्याफार प्रमाणात आहेच) तो आपल्या चर्चेला महत्त्वाचा नाहीं. शरीराची शोभा किंवा सौन्दर्य वाढविण्यासाठीं (अथवा शरीराचे दोष झाकण्यासाठीं) अलंकाराची योजना करावयाची ती प्रत्येक व्यक्तीचीं शारीरिक वैशिष्ट्यें लक्षात घेऊनच केली पाहिजे.

अलकार म्हटला म्हणजे त्याच्या तेजस्वीपणामुळे अथवा अन्य गुणविशेषामुळें पाहाणाराचे लक्ष शरीराच्या अवयवापेक्षा त्याकडेच अधिक वेधलें जातें. म्हणजे एका प्रकारें अवयवाला गौणत्व येतें. याच्या उलट, ज्या ठिकाणीं अलंकार असेल त्या अवयवाकडे अप्रत्यक्षपणें लक्षही वेधलें जात असतें. ह्या दोन्ही गोष्टी ध्यानात ठेवून अलंकाराची योजना केली पाहिजे. व्यंग अथवा दोष झाकावयाचा असेल तर अलंकार विशेष प्रकट किंवा डोळ्यात भरण्यासारखा पाहिजे. नाक चपटें किंवा आकारदृष्ट्या सदोष असेल तर तो दोष उठावदार किंवा गडद रंगाच्या फ्रेमच्या चष्म्यानें झाकता येतो. पण नाकातील तेजस्वी चमकीनें किंवा भल्या मोठ्या नथीनेंही कांहीं

ह्या कार्यभाग तितकासा साधतां येत नाहीं. ह्या अलंकारांनीं नाकाकडे लक्ष जातेंच व नतर त्याची सदोष आकृती ध्यानात येते.

वस्त्राची योजना ज्याप्रमाणें शरीराच्या आकर्षक मर्यादाना अथवा अवयवाच्या रम्यतेला मारक नसावी, तद्वतच अलंकार देखील विस्ताराच्या किंवा रचनेच्या दृष्टीनें प्रमाणबद्ध असावेत. लोंबत्या अलंकारांच्या बाबतीत एक गोष्ट लक्षात ठेविली पाहिजे. शरीरमर्यादा व त्यांच्याशी मिळत्या किंवा सगति साधणाऱ्या वस्त्राच्या घड्याची रचना व दिशा यांच्या सयोगानें काहीं वेळा एक प्रकारची एकसूरता (monotony) निर्माण होत असते. अशा वेळी अलंकाराच्या लोंबत्या सरांची किंवा माळाची कौशल्याने योजना केली तर ही एकसूरता नाहींशी करता येते अर्थात्, सराची दिशा देखील कपड्याच्या घड्याशीं पूर्णपणें विरोधी असून चालणार नाहीं, ती थोडीशी मिळती अशीच असावी.

शरीराच्या ठेवणीशी शोभून दिसणारे व तिच्या लयबद्धतेला केव्हाही बाध न आणणारे असेच अलकार 'अलंकार' म्हणून सार्थ होत. इतर लेणीं ही नुसतींच अनवश्यक नव्हेत तर निश्चितपणें सौन्दर्यविघातक ठरतात. सौन्दर्यदृष्टीला गौणत्व आणणाऱ्या पण सामाजिक जीवनातील अनेक तत्त्वाच्या निदर्शक अशा असंख्य गोष्टी अलंकाराच्या निवडीमध्यें सहभागी झालेल्या दिसतात. वेषभूषेच्या प्रचलित कल्पना (किंवा फॅशन्स), धार्मिक भावना, इत्यादि गोष्टी बहुतेक वेळा प्रमाणाबाहेर महत्त्व मिळवून बसतात. अलंकार हे सौन्दर्यवृद्धीसाठींच असले पाहिजेत, व जोपर्यंत ते सोयिस्करपणाच्या दृष्टीनें दोषरहित असतील तोंपर्यंत त्यांच्यावर इतर गोष्टींचें फाजील नियंत्रण असणें इष्ट नाहीं. या दृष्टीनें सनातनी वृत्तीचा

परंपरागत वेशभूषेविषयींचा हट्टाग्रह आणि अंधानुकरणालाच पुरोगामित्वाचें किंवा तथाकथित सौन्दर्यप्रसाधनाचें, सोज्ज्वल पण वस्तुतः धादात खोटें अभिधान घेऊन तत्त्वशून्य प्रचार करणाऱ्यांचा बेजबाबदारपणा हे दोन्ही प्रकार सारखेच निषेधार्ह आहेत.

## केशरचना

केशरचना कोणत्या प्रकारें करावी हें अनेक गोष्टींवर अवलंबून असतें. केसाची विपुलता, लांबसडकपणा, वळणदारपणा इत्यादि स्वाभाविक गुणधर्म व त्याचबरोबर चेहऱ्याची नैसर्गिक ठेवण इतक्या सर्व गोष्टींचा एकत्र विचार करून केशरचनेचा प्रकार निश्चित करावा लागतो.

डोक्याची व चेहऱ्याची ठेवण सामान्यतः कशी असावी हे पूर्वीं सांगितलेंच आहे. सामान्य घडणीपेक्षा चेहऱ्यात किती फरक आहे किंवा कोणतीं वैगुण्यें आहेत हें प्रथमतः लक्षात घेऊन केशरचनेच्या साह्यानें जर ती वैगुण्यें कमी दिसतील असें करता येणें शक्य असले तर तसा प्रयत्न आधीं केला पाहिजे. चेहरा उभट असेल व त्या मानाने त्याची लांबी कमी असेल तर केशभार डोक्याच्या पाठीमागे जास्त आणून त्याच्या साह्याने अवास्तव उभटपणाचा परिणाम थोडासा तरी कमी करता येईल. चेहऱ्याची रुंदी कमी असेल तर केस कानावर थोडेसे सैल करून रुंदीचा आभास निर्माण करता येईल. चेहरा प्रमाणाबाहेर रुंद असेल तर केसाचा कानावरील विस्तार थोडासा मर्यादित करून तसेंच कपाळाच्या वरचे केस थोडेसे सैल ठेवून उंचीचा भास उत्पन्न करता येईल.

तथापि अशा प्रकारची योजना करतांना दुसरी एक गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे. केशरचनेमध्यें केसांच्या बटाना ज्या लहरी

किंवा दिशा मिळतात त्या चेहऱ्याच्या वळणाशीं जुळणाऱ्या किंवा संगति (harmony) साधणाऱ्या असल्या पाहिजेत. त्या तशा नसतील तर चेहऱ्याचें सौंदर्य वाढण्याऐवजीं उलट अधिक प्रकट दिसणारें असें वैगुण्य निर्माण होईल. भुवया, नाक, ओठ वगैरे अवयवाना कोणत्याहि प्रकारचा वळणदारपणा असणें हें स्त्रियाच्या अनेक वैशिष्ट्यापैकीं एक आहे. तेव्हां त्या वळणदारपणाचा प्रकार लक्षांत घेऊन त्याच्याशीं रम्यशी संगती साधणारें वळण केसांना लावून तदनुरोधानें केशरचना केली पाहिजे.

भांग पाडल्यानें चेहऱ्याची उची वाढून दिसते व तो कपाळाच्या मध्यभागीं असेल तर नाकाच्या सरळ रेषेशीं त्याची एकप्रकारें संगति निर्माण होते. तिरपा भांग अरुंद कपाळालाच फक्त शोभून दिसतो. कारण, भागाच्या रेषेने अप्रत्यक्षपणें कपाळाचेही दोन भाग पाडल्याचा परिणाम उत्पन्न होतो व अरुद कपाळाच्या मोठ्या भागाचा विस्तारही वाईट दिसण्याजोगा नसतो.

विस्तीर्ण कपाळाच्या आडव्या व उभ्या मर्यादांमुळें निर्माण होणारी एकसूरता, स्वतंत्रपणें संचार करणाऱ्या कुरळ्या वळणदार बटांनीं नाहींशी करतां येते. पण त्यांचें खरें प्रयोजन काय हें न कळल्यामुळें अरुंद कपाळ असणाऱ्या स्त्रिया देखील ही पद्धत उपयोगांत आणूं पाहतात तेव्हा त्यापासून चागला परिणाम होण्याऐवजीं विचित्रपणाच निर्माण होतो.

केसावर शस्त्रक्रिया केल्यानें त्यांचें व चेहऱ्याचें सौंदर्य वाढतें किंवा नाहीं हा प्रश्न विवाद्य आहे. केसांना शस्त्रसंपर्क होणें ही गोष्ट (अर्थात्, केशवपनाच्या निंद्य प्रथेखेरीज) आपल्या परंपरेशीं विरोधी असून आपल्या समाजामधील ज्यांनीं ती पाश्चात्य पद्धत

उचललेली आहे त्याचें सौदर्य त्यामुळें वाढलें आहे असें कांहीं दिसत नाहीं. कापलेल्या केसाचा उपयोग डोक्याला एका प्रकारची पार्श्वभूमी तयार करून चेहऱ्याला उठावदारपणा आणण्याकडे होत असला पाहिजे. पायापासून खाद्यापर्यंत शरीराच्या मर्यादाना जे नागमोडी व रम्य असें प्रवाही उभें वळण असतें त्याची दिशा खाद्यापासून तीव्रपणें बदलते. कापलेल्या मोकळ्या केसांच्या विस्तारामुळें हा परिणाम कमी होऊन पायापासून डोक्याच्या वरच्या भागापर्यंत शरीराच्या आकृतीला एकप्रकारचे अखंडत्व लाभतें. पण हा परिणाम केस न कापताही साधता येईल. कापलेल्या केसाच्या सौदर्यापेक्षा लांब व विपुल अशा प्रवाही केशभाराचे वैभव निश्चितपणें अधिक असतें.

डोक्याचा एकदर आकार ध्यानात घेऊन त्याला कोठेंहि विकृति येणार नाही किंवा केसाच्या पुजक्यामुळें, आंबाड्यामुळें, किंवा अवास्तव रीत्या मोकळ्या सुटलेल्या किंवा स्वैर अशा बटामुळें चेहऱ्याचें स्वाभाविक स्वरूप (outline) लोपून त्याला वेगळाच आकार येणार नाही अशी दक्षता घेणे अत्यवश्यक आहे. यामुळेंच जुन्या पद्धतीचा खोपा, प्रमाणाबाहेर मोठा आंबाडा व असले दुसरे प्रकार निश्चितपणें सौदर्यविघातक ठरतात. घराण्याचें 'बाळबोध वळण' राखण्यासाठी भाग फाटेपर्यंत केस ताणून सर्व चेहऱ्याला विद्रूपता आणण्याचे प्रकार आतां नाहींसे होऊं लागले आहेत व त्यामुळें नैसर्गिक सौदर्याचा एक मोठा शत्रु नाहींसा होत आहे ही समाधानाची गोष्ट आहे. पण जुन्या रीतींपैकीं अनुचित तेवढ्या टाकताना ज्या नव्या रीती स्वीकारावयाच्या त्याही पूर्णपणें पारखून स्वीकारल्या तर एकंदरींत सौंदर्यदृष्ट्या मोठाच लाभ होईल.

पाठीवरच्या शेपट्याविषयीं चार शब्द लिहिले नाहींत तर त्या नव्या प्रथेचा तो अपमानच होईल. चेहऱ्याच्या पुढून निघणाऱ्या भुवयाच्या, नाकपुड्यांच्या, ओठाच्या व हनुवटीच्या खालील मर्यादेच्या आडव्या रेषा वाढविल्या तर त्यांचें आणि कपाळाकडून पाठीमागें रम्यतेनें झुकत येणारे प्रवाही केस याचें शेपट्याच्या आरंभाशीं मीलन अथवा संगम होऊन तो संयुक्त प्रवाहच जसा कांहीं पाठीमागें अखडपणे वाहात जातो. त्याची लांबी व जाडी जितकी जास्ती तेवढें त्याचे वैभवहि मोठें. शिवाय वय कमी करण्याचीहि जादू शेपट्यामध्यें आहे ती वेगळीच. तथापि ह्या प्रकारच्या केशरचनेला वयाची मर्यादा घातली तर पुष्कळवेळा रसिक पुरुषाच्या अनुभवाला येणारा अपेक्षाभंग चुकविता येईल.

## पादत्राणें

पादत्राणांच्या सौंदर्यगुणाला निदान अल्पसें स्थान तरी द्यावेंच लागेल. स्त्री-पुरुषाच्या कार्यक्षेत्राची स्वाभाविक वाटणी पाहिली म्हणजे उपयुक्ततेच्या दृष्टीनें पुरुषाच्या पादत्राणाचा जेवढा विचार करावा लागेल त्याहीपेक्षा अधिक विचार सौंदर्याच्या दृष्टीनें स्त्रियांच्या पादत्राणाचा करावा लागेल. हवामानाच्या दृष्टीनें अवश्य नसेल तर स्त्रियाचीं पाउलें पूर्णपणें झांकल्याने त्यांच्या रम्य व सुरुचिर दर्शनाला जग विनाकारण पारखे होतें. स्त्रियांना देखील स्वभावतः ही गोष्ट तितकीशी आवडत नाहीं असें म्हणतात. अर्थात्, चर्चा करावयाची ती पट्ट्याच्या रंगाबद्दल व टाचांच्या उंचीविषयींचीच. पट्ट्याचा विचार रंगाच्या दृष्टीनें येथे करीत नाहीं. आडवा रुंद पट्टा असण्यापेक्षां अंगठ्यापासून पाठीमागें विभा-

गत जाणाऱ्या दोन नाजुक पट्ट्या आणि अगदीं अवश्य तरच बारिकसा आडवा पट्टा शोभून दिसतो. पण एकंदरीत पट्ट्याचा प्रकार कसा असावा हें बव्हंशी नेसलेल्या वस्त्रावर अवलंबून राहील.

उंच टांचांची युक्तता, ज्या देशामध्यें ती पद्धत सर्रास चालू होती व आहे तेथील लोकांना देखील, पूर्णपणें पटलेली नाहीं. नाहीं तर उघडपणें त्याविरुद्ध प्रचार चालला नसता. उच टाचाच्यामुळें व्यक्तीची उंची वाढून दिसते खरी, पण त्याच्या बरोबरच तोल साभाळण्यासाठी, निदान संवय होईपर्यंत तरी, फार प्रयास पडतात. तसेंच समतोलपणा साधण्यासाठीं शरीराला जी अनैसर्गिक वक्रता येते, तिच्यामुळें कुबड काढून चालावें तरी लागतें किंवा मुद्दाम छाती पुढे काढून पुरुपासारखी मर्दानी चाल स्वीकारावी लागते. पहिल्या पद्धतीमध्यें नितब शरीराच्या उभ्या मर्यादारेषेबाहेर फेकले जाऊन विशेष प्रकट दिसतात तर दुसऱ्या पद्धतीमध्ये स्तनाना जास्त प्रकटपणा येतो. प्रत्यक्ष पायाना या प्रकारच्या टांचांपासून किती त्रास किंवा सुख होत असेल तें मला सागता येणार नाहीं. परतु अभिरुचीचा 'अद्ययावत्पणा' दाखविता यावा एवढ्यासाठीं स्त्रिया अनेक प्रकारचे हाल किंवा त्रास सहन करायला तयार असतात हें कांहीं खोटे नाहीं.

## रंगविचार

सौन्दर्याच्या दृष्टीनें रंगाचें महत्त्व दुय्यम प्रकारचें आहे ही गोष्ट पूर्वींच स्पष्ट केली आहे. तथापि रंगाची पूर्णपणें उपेक्षा करूनहि चालणार नाहीं. शरीराचा रंग हा भौगोलिक परिस्थिती-

वर अवलंबून असतो तितकाच वंशावर किंवा जातीवर असतो. रंगाचा प्रकार कसाही असला तरी त्यांतील तेजस्वीपणा बऱ्याच अंशीं आरोग्यावर अवलंबून असतो. आपण गोरें असावें असें सर्वांनाच वाटत असते. निदान आपला काळेपणा तरी कमी दिसावा यासाठीं अप्रत्यक्षपणें प्रयत्न चालू असतात. वर्णाचा मुख्य दोष आणि गौण स्वरूपाचे त्वचेचे दोष झाकण्यासाठींच सौंदर्य-प्रसाधनेच्या कृत्रिम उपायाची आवश्यकता भासूं लागते. सौंदर्य-प्रसाधन कसे करावे याविषयींची चर्चा मला येथें करावयाची नाहीं. तथापि तें कसे 'नसावें' याबद्दल काही गोष्टी सांगणें अवश्य वाटते. चेहऱ्यावरील रंगकाम सहजपणें ओळखतां आलें तर त्याची मोहिनी कशी राहणार? अर्थात्, आपली नैसर्गिक अंगकांति लक्षात घेऊन तिच्याशीं फारसे विरोधी नाहींत अशाच रंगांची योजना केली पाहिजे. म्हणजे, रंगविरोधापेक्षा रंगसंगती-कडेच अधिक लक्ष पुरविले पाहिजे. गालावर लावावयाचा रंग व ओठाचा उसना लालपणा चेहऱ्याशीं फारसा विसंगत दिसता कामा नये. आपल्याच वर्णाची (रंगाच्या दृष्टीनें) अत्यंत निरोगी स्त्री पाहून तिच्या चेहऱ्यावर प्रतीत होणाऱ्या नैसर्गिक रंगाचें निरीक्षण करूनच आपल्या चेहऱ्यावरील रंगकाम केलें पाहिजे. शिवाय, रंगाच्या साह्यानें उजळ केलेला चेहरा त्या व्यक्तीच्या इतर शरीराशी सुसंगत दिसला पाहिजे. तथापि ही सर्व खटपट करण्यामध्यें घालविण्यांत येणारा वेळ जर आरोग्यसंपादन कर-ण्याच्या प्रयत्नात घालविला तर जो चिरस्थायी परिणाम साधेल तो कृत्रिम सौंदर्यप्रसाधनेवर शेंकडों रुपये खर्चूनही साधता येणार नाहीं. स्त्रीनें आपले नैसर्गिक दोष झांकण्याचा प्रयत्न

करूं नये असें मुळींच नाही. तथापि अशा प्रयत्नांपासून जास्तींत जास्त काय साधतां येईल याचा प्रथम विचार करूनच त्या भानगडींत पडावें.

केसांचा व डोळ्यांचा रंग कसा असावा हें अंगकान्तीवरच मुख्यतः अवलंबून असतें. छटेच्या दृष्टीनें केसाचा व डोळ्याचा रंग अंगकान्तीच्या छटेपेक्षा अधिक फिकट असूं नये. गोऱ्या स्त्रियानाच भुरकट किंवा पिंगट रंगाचे केस व घारे डोळे शोभून दिसतात. घाऱ्या डोळ्यामध्येंहि अनेक प्रकार असतात. निळसर घाऱ्या डोळ्यापेक्षा हिरवट घारे डोळे छटेच्या दृष्टीनें फिकट ठरतात, तर ताबुस किंवा पिंगट घारे डोळे अधिक दाट दिसतात. श्यामवर्णी स्त्रियाना फिकट छटेचे केस तितकेसे शोभन दिसत नाहींत, निळसर किंवा हिरव्या छटेचे घारे डोळे देखील विसंगत दिसतात. डोळे हे चेहऱ्यावरील सर्वांत अधिक महत्त्वाचे व प्रधान अवयव असल्याकारणान रंगाच्या व छटेच्या (shade) दृष्टीनें इतर अवयवापेक्षा त्याना गौणत्व येता कामा नये. गोऱ्या अंगकान्तीला काळेभोर केस व डोळे रंगविरोधामुळें दृष्टींत भरण्याइतके उठावदार दिसले तरी फिकट छटेचे केस व अंगकान्तीच्या प्रधान रंगाशीं जुळणाऱ्या छटेचे घारे डोळे अधिक रम्य व सुखकर दिसतात. थोडक्यात सांगावयाचें म्हणजे केस, डोळे व अंगकान्ति याच्या रंगामध्यें संवादित्व व छटेच्या दृष्टीनें समतोलपणा असावा.

वस्त्रांच्या रंगाविषयीं असें सांगता येईल की गोऱ्या स्त्रियाना कोणत्याही रंगाचे कपडे साधारणपणें शोभून दिसतात. तथापि अंगकान्तीमध्यें जो रंग किंवा छटा प्रमुख असेल तिचें वस्त्राच्या रंगामध्येंहि प्राधान्य असावें. वापरलेल्या अनेक कपड्यांमध्येंही रंग-

विरोध फारसा असूं नये. भडक रंग किंवा तीव्र रंगविरोध लक्ष आकर्षून घेणारा असला तरी त्याचा परिणाम दृष्टीला सुखकर नसतो. अंगकान्ति सावळी असेल तर गुलाबी, पिवळ्या किंवा साधारणपणें कोणत्याहि फिकट रंगाच्या वस्त्राचा हव्यास धरूं नये. कारण, फिकट वस्त्रामुळें अंगकांतीचा सांवळेपणा किंवा काळेपणा अधिकच स्पष्ट दिसून येतो. विशेषतः गुलाबी रंगाचें श्यामल वर्णाशीं वाकडें आहे. वेगवेगळ्या रंगाचीं वैशिष्ट्ये, संगति व विरोध यांचा अभ्यास करूनच वस्त्राच्या रंगाची निवड केली पाहिजे.

ऋतुमानाप्रमाणें निसर्गश्रीचे रंगही बदलत असतात. निसर्गाच्या रंगांचा एकंदर वातावरणावर बराच परिणाम होत असतो. वातावरणाचा प्रमुख रग असेल तो वस्त्राना पार्श्वभूमीप्रमाणें असतो, व त्या गोष्टीचा देखील अल्पशा प्रमाणांत लाभ करून घेता येईल. वर्षाऋतूमध्यें चोहीकडे हिरवळ पसरलेली असते. अशावेळीं हिरवा किंवा त्याच्या सारखा वस्त्राचा रंग वातावरणाच्या प्रधान रंगाशीं मिळून जात असला किंवा संगति साधीत असला तरी वातावरणाच्या रगाची एकसूरता मोडणारा वस्त्राचा रंग अधिक रम्य व सुखकर वाटतो. ग्रीष्म ऋतूमध्ये हिरवळीचा अभावच दृष्टीला पडतो व तीव्र प्रकाशांतील रखरखाटाला दृष्टी त्रासलेली असते. अशा वेळीं दाट हिरव्या रंगाच्या वस्त्रानें डोळ्याना सुख होतें.

# आधारग्रंथांची सूची


1. Physiology of Sex :
   BY *Kenneth Walker*

2. Anatomical Diagrams for Art Students :
   BY *James M. Dunlop.*

3. Bridgman's Life Drawing ·
   BY *George B. Bridgman.*

4. The Human Form in Art .
   BY *A. A Braun.*

5. Nudes of All Nations .
   PUBLISHERS
   *George Routledge & Sons, Ltd., London.*